दादा भगवान प्ररूपित

# जगत कर्ता कोण?

मूल गुजराती संकलन : डॉ. नीरूबहन अमीन

मराठी अनुवाद : महात्मागण

**प्रकाशक** : अजीत सी. पटेल
दादा भगवान विज्ञान फाउंडेशन
1, वरूण अपार्टमेंट, 37, श्रीमाळी सोसायटी,
नवरंगपुरा पुलिस स्टेशनच्या समोर,
नवरंगपुरा, अहमदाबाद - 380009,
Gujarat, India.
**फोन** : +91 79 3500 2100



**प्रथम आवृत्ति** : 500 डिसेंबर, 2021

**भाव मूल्य** : 'परम विनय' आणि
'मी काहीच जाणत नाही', हा भाव!

**द्रव्य मूल्य** : 20 रुपए

**मुद्रक** : अंबा मल्टीप्रिंट
B-99, इलेक्ट्रॉनिक्स GIDC,
क-6 रोड, सेक्टर-25,
गांधीनगर-382044.
Gujarat, India.
**फोन** : +91 79 3500 2142

**ISBN/eISBN : 978-93-91375-10-2**

**Printed in India**

# त्रिमंत्र





नमो अरिहंताणं

नमो सिद्धाणं

नमो आयरियाणं

नमो उवज्झायाणं

नमो लोए सव्वसाहूणं

एसो पंच नमुक्कारो

सव्व पावप्पणासणो

मंगलाणं च सव्वेसिं

पढमं हवइ मंगलं ॥ १ ॥

ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥ २ ॥

ॐ नम: शिवाय ॥ ३ ॥

जय सच्चिदानंद





## दादा भगवान कोण ?

जून १९५८ संध्याकाळची अंदाजे सहाची वेळ, सुरत स्टेशनवर अलोट गर्दी होती. रेल्वेच्या प्लेटफॉर्म नंबर तीनच्या बाकावर बसलेल्या श्री अंबालाल मूळजीभाई पटेल रूपी देहमंदिरात नैसर्गिक स्वरूपात कित्येक जन्मांपासून व्यक्त होण्यासाठी आतूर असलेले 'दादा भगवान' संपूर्णपणे प्रकट झाले आणि निसर्गाने सर्जन केले अध्यात्माचे अद्भुत आश्चर्य! एका तासात त्यांना विश्वदर्शन लाभले! मी कोण ? भगवंत कोण ? जग कोण चालवित आहे ? कर्म म्हणजे काय ? मुक्ती कशाला म्हणतात ? इत्यादी जगातील सर्व आध्यात्मिक प्रश्नांची रहस्ये संपूर्णपणे प्रकट झाली.

त्यांना प्राप्ती झाली तशी ते फक्त दोन तासात इतर मुमुक्षूनां सुद्धा आत्मज्ञानाची प्राप्ती करवित असत, त्यांच्या सिद्ध झालेल्या अद्भुत ज्ञान प्रयोगाद्वारे! त्याला अक्रम (क्रमविरहीत) मार्ग म्हटले जाते. क्रम म्हणजे पायरी पायरीने, क्रमाक्रमाने वर चढणे! अक्रम म्हणजे लिफ्ट मार्ग! शॉर्ट कट!

ते स्वत: प्रत्येकाला 'दादा भगवान कोण ?' याबद्दलची फोड करून देताना म्हणायचे की, "हे दिसतात ते 'दादा भगवान' नाहीत. हे तर 'ए.एम. पटेल' आहेत. आम्ही ज्ञानी पुरुष आहोत आणि आत प्रकट झाले ते दादा भगवान आहेत. दादा भगवान तर 'चौदालोकाचे' नाथ आहेत, ते तुमच्यात पण आहेत, सर्वांमध्ये आहेत! तुमच्यात अव्यक्त रुपात आहेत आणि 'येथे' माझ्या आत संपूर्णपणे व्यक्त झालेले आहेत! मी स्वत: भगवान नाही. माझ्या आत प्रकट झालेले 'दादा भगवान' यांना मी पण नमस्कार करतो."

## आत्मज्ञान प्राप्तीची प्रत्यक्ष लींक

परम पूज्य दादा भगवान (दादाश्री) यांना 1958 मध्ये आत्मज्ञान प्रकट झाले. त्यानंतर 1962 ते 1988 पर्यंत देश-विदेश परिभ्रमण करून मुमुक्षुंना सत्संग आणि आत्मज्ञानाची प्राप्ती करवित असत.

दादाश्रींनी आपल्या हयातीतच आत्मज्ञानी पूज्य डॉ. नीरूबहन अमीन (नीरूमा) यांना आत्मज्ञान प्राप्त करवून देण्याची ज्ञानसिद्धी प्रदान केली होती. दादाश्रींच्या देहविलयानंतर नीरूमा त्यांच्याप्रमाणेच मुमुक्षुंना सत्संग व आत्मज्ञान प्राप्ती निमित्त भावाने करवित असत.

आत्मज्ञानी पूज्य दीपकभाई देसाई यांना सुद्धा दादाश्रींनी सत्संग करण्याची सिद्धी प्रदान केली होती. वर्तमानात पूज्य नीरूमांच्या आशीर्वादाने पूज्य दीपकभाई देश-विदेशात निमित्तभावाने आत्मज्ञान प्राप्ती करवित आहेत.

या आत्मज्ञान प्राप्तीनंतर हजारो मुमुक्षु संसारात राहून, सर्व जबाबदाऱ्या सांभाळत असताना सुद्धा आतून मुक्त राहून आत्मरमणतेचा अनुभव घेत आहेत.

# निवेदन

ज्ञानी पुरुष दादा भगवान यांच्या श्रीमुखातून अध्यात्म आणि व्यवहार ज्ञानासबंधित जी वाणी निघाली, तिला रेकॉर्ड करून संकलन व संपादन करून पुस्तकाच्या रूपाने प्रकाशित केली जात आहे.

परम पूज्य दादाश्री हिन्दी फार कमी बोलायचे, कधी हिन्दी भाषी लोक यायचे की ज्यांना गुजराती भाषा समजत नसे त्यांच्यासाठी परम पूज्य दादाश्री हिन्दीत बोलायचे आणि ती वाणी कॅसेटस्मधून जशीच्या तशी ट्रान्स्क्राईब करून (हिन्दी) आप्तवाणी ग्रंथ तयार करण्यात आला आहे. नंतर त्या आप्तवाणी ग्रंथाला वाचकांच्या सुविधेसाठी पुन्हा संकलित करून सहा छोटी पुस्तके तयार करण्यात आली आहेत.

1) ज्ञानी पुरुषाची ओळख
2) जगत कर्ता कोण?
3) कर्माचा सिद्धांत
4) अंत:करणाचे स्वरूप
5) सर्व दु:खांपासून मुक्ती
6) आत्मबोध

प्रस्तुत पुस्तकात त्याच मूळ (हिन्दी) ग्रंथाला मराठी भाषेत यथार्थ रूपाने अनुवादित करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु दादाश्रींच्या आत्मज्ञानाचा आशय जसा आहे तसा तर आपल्याला गुजराती भाषेतच अवगत होईल. ज्यांना ज्ञानाचा गहन अर्थ समजून घ्यायचा असेल, ज्ञानाचे खरे मर्म समजायचे असेल त्यांनी ह्या हेतूने गुजराती भाषा शिकावी असा आमचा अनुरोध आहे.

प्रस्तुत पुस्तकात काही ठिकाणी कंसात दर्शविलेले शब्द किंवा वाक्य दादाश्रींद्वारा बोलल्या गेलेल्या वाक्यांना अधिक स्पष्टतापूर्वक समजावण्यासाठी लिहिले गेले आहेत. तसेच काही ठिकाणी इंग्रजी शब्दांना मराठी अर्थाच्या रूपात ठेवले गेले आहेत.

अनुवादासंबंधी उणीवांबद्दल आपले क्षमा प्रार्थी आहोत.

**- डॉ. नीरूबहन अमीन**

# दादा भगवान फाउन्डेशनची प्रकाशित मराठी पुस्तकें

1. भोगतो त्याची चूक
2. एडजस्ट एवरीव्हेर
3. जे घडले तोच न्याय
4. संघर्ष टाळा
5. मी कोण आहे ?
6. क्रोध
7. चिंता
8. प्रतिक्रमण (सं)
9. भावना सुधारे जन्मोजन्म
10. कर्माचे विज्ञान
11. पाप-पुण्य
12. आई-वडील आणि मुलांचा व्यवहार (सं)
13. पति-पत्नीचा दिव्य व्यवहार (सं)
14. समजपूर्वक प्राप्त ब्रह्मचर्य (सं)
15. मानव धर्म
16. मृत्युवेळी, आधी आणि नंतर
17. सेवा-परोपकार
18. दान
19. त्रिमंत्र
20. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर स्वामी
21. चमत्कार
22. सत्य-असत्याचे रहस्य
23. वाणी, व्यवहारात (सं)
24. पैशांचा व्यवहार (सं)
25. क्लेश रहित जीवन
26. निजदोष दर्शनाने... निर्दोष!
27. प्रेम
28. गुरू-शिष्य
29. अहिंसा
30. आप्तवाणी-1, 2
31. जगत कर्ता कोण ?
32. कर्माचा सिद्धांत

## हिन्दी

1. आत्मसाक्षात्कार
2. ज्ञानी पुरुष की पहचान
3. सर्व दु:खों से मुक्ति
4. कर्म का सिद्धांत
5. आत्मबोध
6. मैं कौन हूँ ?
7. पाप-पुण्य
8. भुगते उसी की भूल
9. एडजस्ट एवरीव्हेयर
10. टकराव टालिए
11. हुआ सो न्याय
12. चिंता
13. क्रोध
14. प्रतिक्रमण (सं, ग्रं)
16. दादा भगवान कौन ?
17. पैसों का व्यवहार (सं, ग्रं)
19. अंत:करण का स्वरूप
20. जगत कर्ता कौन ?
21. त्रिमंत्र
22. भावना से सुधरे जन्मोंजन्म
23. चमत्कार
24. प्रेम
25. समझ से प्राप्त ब्रह्मचर्य (सं, पू, उ)
28. दान
29. मानव धर्म
30. सेवा-परोपकार
31. मृत्यु समय, पहले और पश्चात्
32. निजदोष दर्शन से... निर्दोष
33. पति-पत्नी का दिव्य व्यवहार (सं)
34. क्लेश रहित जीवन
35. गुरु-शिष्य
36. अहिंसा
37. सत्य-असत्य के रहस्य
38. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर स्वामी
39. माता-पिता और बच्चों का व्यवहार (सं)
40. वाणी, व्यवहार में... (सं)
41. कर्म का विज्ञान
42. सहजता
43. आप्तवाणी - 1 से 9
52. आप्तवाणी - 13 (पूर्वार्ध व उत्तरार्ध)
54. आप्तवाणी - 14 (भाग-1, 2)
56. ज्ञानी पुरुष (भाग-1)

**( सं - संक्षिप्त, ग्रं - ग्रंथ, पू - पूर्वार्ध, उ - उत्तरार्ध )**

**★ दादा भगवान फाउन्डेशन द्वारे गुजराती आणि इंग्रजी भाषेत सुद्धा बरीच पुस्तके प्रकाशित झाली आहे। वेबसाइट www.dadabhagwan.org वर सुद्धा आपण ही सगळी पुस्तके प्राप्त करू शकता।**

**★ प्रत्येक महिन्यात हिन्दी, गुजराती आणि अंग्रेजी भाषेत दादावाणी मेगेझीन प्रकाशित करीत आहे।**

# संपादकीय

अनादि काळापासून जगाची वास्तविकता जाणण्यासाठी मनुष्य प्रयत्नशील आहे. परंतु तो खरे काय ते जाणू शकलेला नाही. मुख्यत: वास्तविकतेत, 'मी कोण आहे? या जगाला चालविणारा कोण आहे? तसेच जगाचा रचनाकार कोण आहे?' हे जाणून घ्यायला हवे. प्रस्तुत संकलनात खरा कर्ता कोण आहे, हे रहस्य उघड केले आहे.

सामान्यत: काही चांगले झाले तर 'मी केले' असे तो मानतो आणि वाईट झाले तर दुसऱ्यावर आक्षेप घेतो की 'त्याने बिघडविले.' नाही तर 'माझी ग्रहदशा बिघडली आहे' असे बोलतो, किंवा 'देवाने केले' असा आरोप पण करतो. या सर्व रॉंग बिलीफस् (चुकीच्या मान्यता) आहेत. देव काय असा पक्षपात करणारा आहे का, की तो आपले नुकसान करील?

हे जग कोणी बनविले? जर कोणी बनविणारा असेल तर मग त्याला कोणी बनविले? मग त्या बनविणाऱ्याला कोणी बनविले? म्हणजे या गोष्टीचा अंतच नाही. आणि दुसरा असाही प्रश्न पडतो की, जर त्याला जग बनवायचेच होते तर त्याने असे जग का बनविले की ज्यात सर्व दु:खीच आहेत? कोणीच सुखी नाही? म्हणजे त्याची मौज आणि आमची शिक्षा, हा कसला न्याय?

या विज्ञानाने हे सिद्ध केले आहे की विश्वात शाश्वत तत्त्वे आहेत. शाश्वत म्हणजे ज्याची उत्पत्ती नाही आणि ज्याचा विनाशही होत नाही. अर्थात अनादि-अनंत. आपल्या आत असलेला आत्माही शाश्वत आहे. हे जग कोणीच बनविलेले नाही, आणि त्याचा नाशही होत नाही. हे जग होते, आहे आणि असेल. मग त्याला बनविण्याची गरजच कुठे आहे? हे विश्व स्वयंभू आहे आणि स्वयं-संचालित आहे. देवाने यात काहीच केले नाही, तो तर ज्ञाता-द्रष्टा-परमानंदी आहे.

या काळात कर्त्या संबंधीचा सिद्धांत पहिल्यांदाच विश्वाला यथार्थपणे परम पूज्य दादा भगवानांनी दिला आहे, आणि तो असा आहे की या जगात कोणीही स्वतंत्र कर्ता नाही. या जगाला रचणारा

किंवा चालविणारा कोणीही नाही. हे जग सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्सने चालत आहे. ज्याला परम पूज्य दादाश्री 'व्यवस्थित शक्ती' असे म्हणतात.

जगात कोणीही स्वतंत्र कर्ता नाही, परंतु सगळे नैमित्तिक कर्ता आहेत, सगळे निमित्त आहेत. गीतेत पण श्रीकृष्णाने अर्जुनाला सांगितले होते, हे अर्जुना! तू या युद्धात निमित्तमात्र आहेस, तू युद्धाचा कर्ता नाहीस.

परम पूज्य दादाश्रींनी अनेक उदाहरणे देऊन नैमित्तिक कर्त्याचा सिद्धांत समजावला आहे. एक कप चहा बनवायचा असेल तर? कोणी म्हणेल 'मी चहा केला' परंतु वास्तवात पाहिले तर पाणी, साखर, चहा पावडर, दूध, पातेले, स्टोव्ह, काड्यापेटी, कप, अशा कितीतरी वस्तू लागतात, तेव्हा एक कप चहा बनतो. मग चहा कोणी बनविला? ओन्ली सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्स (वैज्ञानिक सांयोगिक प्रमाणे) यामुळे चहा बनला. पण माणूस तर, अज्ञानतेमुळे, भ्रांतीमुळे अहंकार करतो की 'मी केला.' परंतु कोणतेही कार्य सर्व संयोग एकत्र आल्यामुळे होत असते.

प्रस्तुत पुस्तिकेत कर्ता कोण याचे रहस्य साध्या सरळ भाषेत, हृदयात उतरेल अशा प्रकारे समजावून सांगितले आहे.

– **डॉ. नीरूबहन अमीन यांचे**

**जय सच्चिदानंद**

# जगत कर्ता कोण?

## या कोड्याचे तथ्य

**दादाश्री :** या जगाच्या क्रिएटरला (रचनाकाराला) कधी पाहिले आहे का?

**प्रश्नकर्ता :** फोटोत पाहिले आहे.

**दादाश्री :** या जगाच्या क्रिएटरला? क्रिएटरचा फोटो नसतो. फोटो तर, इथे एखादी व्यक्ती असेल, की ज्याच्यासाठी लोक म्हणतात, 'हा देव झाला आहे', तर मग त्याचा फोटो असतो. क्रिएटर ही तर फार मोठी गोष्ट आहे.

**प्रश्नकर्ता :** तर आम्ही असे समजायचे का की हे सर्व मिथ्या आहे?

**दादाश्री :** मिथ्या तर नाही. मिथ्या कशाला म्हणतात, तर समजा, इथे पाणी नाही, पण पाणी आहे असे दिसते त्याला मिथ्या म्हणतात. तसे हे जग मिथ्या नाही. जग पण करेक्ट (खरे) आहे आणि आत्मा पण करेक्ट आहे. द वर्ल्ड इज करेक्ट बाय रिलेटिव्ह व्ह्यू पॉइंट, ॲन्ड आत्मा इज करेक्ट बाय रियल व्ह्यू पॉइंट. समजले का तुम्हाला?

**प्रश्नकर्ता :** रियल आणि रिलेटिव्ह यात काय फरक आहे?

**दादाश्री :** जे रियल आहे, त्याला इतर कुठल्याही गोष्टीच्या आधाराची गरजच नसते. ते स्वत:च्या आधारावरच उभे असते. आणि जे दुसऱ्यांच्या आधारावर असते ते सर्व रिलेटिव्ह आहे. ऑल दीस रिलेटिव्हस् आर टेम्परररी ॲडजस्टमेंट्स ॲन्ड रियल इज पर्मनन्ट.

**प्रश्नकर्ता :** जोपर्यंत आत्मा आहे, तोपर्यंत मनुष्य जिवंत आहे असे समजू शकतो. परंतु शेवटपर्यंत मनुष्याचा अंत तर नसतोच ना?

**दादाश्री :** मनुष्याचा अंत नसतो? तर काय फक्त ह्या गाढवांचा, कुत्र्यांचा, या सर्वांचा अंत आहे?

**प्रश्नकर्ता :** कोणाचाही अंत होत नाही.

**दादाश्री :** तर मग हे कोडे, कोडेच राहणार का? हे कोडे सोडवता येणारच नाही का? जर कुणाचाच अंत होत नसेल तर मग हे कोडे सोडवताच येणार नाही ना! तुम्हाला कधी कोडे पडले नाही का?

**प्रश्नकर्ता :** हो, कोडे तर पडते.

**दादाश्री :** तर काय ह्या कोड्याचे कधी उत्तरच मिळणार नाही का? हे बघा, कोडे हा शब्दच असा आहे की तो स्वत: त्याचे समाधान घेऊनच आला आहे. नाहीतर कोडे हा शब्दच राहणार नाही. प्रथम सोल्युशन (समाधान) असते तरच त्याला कोडे म्हणता येईल ना! यात तुम्हाला समजत नसेल अशी कुठली गोष्ट आहे का? तुम्हाला समजून घ्यायच्या असतील पण समजत नसतील अशा सर्व गोष्टी तुम्ही 'ज्ञानी पुरुषांना' विचारून घ्याव्यात. ज्ञानी पुरुष सर्व काही जाणतात. जगातील सर्व गोष्टी ते जाणतात.

**प्रश्नकर्ता :** ज्याने हे जग बनविले तो साकार आहे की निराकार?

**दादाश्री :** हे बघा, ज्याने हे जग बनविले तो साकारही नाही आणि निराकारही नाही. 'द वर्ल्ड इज दी पझल इट सेल्फ' (जग स्वत:च एक कोडे आहे.)

**प्रश्नकर्ता :** तर मग हे सर्व देवच करवीत आहे का?

**दादाश्री :** देव करवीत नाही. देव यात हातच घालत नाही. देवाने हात घातला तर मग सर्व त्याची जबाबदारी, मग आपली काहीच जबाबदारी नाही, म्हणजे आपण सुटलो. ही जी दुसरी शक्ती काम करत आहे त्याबद्दल आम्ही तुम्हाला सांगतो. देव तर देवच आहे. देवाने

या संसारात कधीच हात घातला नाही. तो तर संसार कसा चालत आहे, ते सर्व पाहत राहतो आणि स्वत: परमानंदात राहतो.

व्यवहारात लोक एकीकडे असे बोलतात की हे सर्व देवाने बनविले आहे आणि दुसरीकडे असेही बोलतात की मोक्ष पण आहे, म्हणजे मोक्षालाही जाऊ शकतो. अहो, मोक्ष आणि देवाने हे सर्व बनविले, या दोन्ही गोष्टीत तर विरोधाभास आहे. जर मोक्ष होत असेल तर देवाची गरजच नाही आणि जर देव हे सर्व बनवीत असेल तर मोक्षाची गरज नाही. जर देवानेच हे सर्व बनविले, तर तो आपला *उपरी* (मालक) झाला, पण तसे नसतेच! आपला अंडरहॅन्डही (आपल्या हाताखाली काम करणारा) कोणी नाही आणि आपला *उपरी* देखील कोणी नाही. तर मग ही दुनिया कोणी बनविली? रचयित्याशिवाय तर हे शक्यच नाही ना?

**प्रश्नकर्ता :** आपल्या हिंदुस्तानात तर लोक त्याला देव-ईश्वर असे म्हणतात आणि सर्व सायंटिस्ट (वैज्ञानिक) त्याला निसर्ग म्हणतात. परंतु कुठली तरी शक्ती नक्कीच आहे की जी हे सर्व संचालन (कंट्रोल) करत आहे.

**दादाश्री :** कंट्रोल तर कोणीच करत नाही. हा तर केवळ एक कंप्युटर आहे. तो कंप्युटरच जगाला चालवतो.

**प्रश्नकर्ता :** मग कंप्युटरला कोण चालवतो?

**दादाश्री :** त्याला चालविण्याची गरजच नाही. तो आपोआपच चालतो. हा जो मेंदू आहे, तो छोटा कंप्युटर आहे आणि जो जगाला चालवतो तो मोठा कंप्युटर आहे. छोट्या कंप्युटरमधून हिशोब मोठ्या कंप्युटरमध्ये जातो.

आणि तू तर म्हणतोस 'मी चालवितो, मी हे केले', पण मग तुझे सर्व कोण चालवितो?

**प्रश्नकर्ता :** तसे तर आमचे सर्व देवच चालवितो.

**दादाश्री :** देवच करत आहे तर मग तुम्ही का करता? जर देव

करत असेल तर तुम्ही तुमचे कर्तापद सोडा आणि जर तुम्ही करत असाल तर देव करतो असे बोलणे सोडा. देव तर सांगतो की 'मी कर्ता नाही', हे सर्व जीव कर्ता आहेत. गाई-म्हशी सर्वच आपले स्वत:चेच करतात, कारण त्यांना मेंदू (बुद्धी) दिला आहे. मेंदू त्यांना जसे चालवितो तसे ते चालतात, बस! देव यात हात घालतच नाही. देव तर तुम्हाला फक्त प्रकाश देतो, दुसरे काही देत नाही. बाकी डोकेफोड तुम्हीच करा. मेंदू तर दिलाच आहे सर्वांना. गाय, बकरी, म्हैस सर्वांनाच मेंदू दिला आहे. ते खाली उतरतात, वर चढतात, हे सर्व मेंदूमुळे चालत असते, देव चालवीत नाही.

ते वैज्ञानिक (शास्त्रज्ञ) आम्हाला सांगतात की गॉड इज नॉट क्रिएटर ऑफ धिस वर्ल्ड (देव या जगाचा निर्माता नाही) असे आम्हाला वाटते. कारण असे संशोधन झाले आहे की आपण काही तरी करू शकतो. त्यावर आम्ही म्हटले की 'तुम्ही काही तरी करू शकता परंतु कुठपर्यंत करू शकता? त्याची लिमिट (मर्यादा) आहे. लिमिट कुठपर्यंत? तर बुद्धी लावू तिथपर्यंत.' बुद्धीच्या पुढे कोणी जाऊ शकत नाही. बुद्धीने चालत आहे. यात देवाचा हस्तक्षेप नाही. बघा ना, जगातील लोक मानतात की देवाने हे सर्व बनविले आहे. सगळेच, लहान मुलेदेखील असेच समजतात. पण ही गोष्ट खरी नाही, वास्तविक नाही. ही तर लौकिक गोष्ट आहे. लौकिक सामान्य लोकांसाठी असते. परंतु आपण शोध घ्यायला हवा की नेमकी खरी गोष्ट काय आहे? याचा शोध घ्यायला नको का?

तुम्हाला जर वास्तविक गोष्ट नको असेल आणि व्ह्यू पॉइंट (दृष्टीकोन) ने हे समजून घ्यायचे असेल तर तसेही आम्ही सांगू की देवाने हे सर्व बनविले आहे, आणि देवच हे सर्व चालवीत आहे. आणि तुम्हाला काय करायचे आहे तेही आम्ही सांगू की, काही वाईट घडले तर देवाची इच्छा असे बोला. नुकसान झाले तरी देवाची इच्छा आणि फायदा झाला तरी देवाचीच इच्छा. मूल जन्मले तीही देवाची इच्छा आणि मूल गेले तीही देवाचीच इच्छा. असे सर्व बोलाल तर तुमचे जीवन चांगले जाईल. ही आम्ही रिलेटिव्ह गोष्ट सांगत आहोत. कारण

रियल गोष्ट, वास्तविक गोष्ट तर तुम्हाला समजणार नाही, म्हणून असे सांगत आहोत. जे काही घडले ती सर्व देवाची इच्छा, इतके जरी समजले, तरी खूप झाले.

## क्रिएशनचा कर्ता कोण ?

तुम्ही अध्यात्माविषयी सर्व प्रश्न विचारू शकता. त्या सर्वांची उत्तरे येथे तुम्हाला मिळतील. तुम्हाला कधी पझल (कोडे) नाही का पडत ? सगळेजण दिवसभर कोड्यातच अडकलेले असतात. या कोड्यातच सगळेजण डिजॉल्व झाले आहेत. (गोंधळून गेले आहेत.) तुम्हाला काही विचारायचे असेल तर विचारा, आम्ही सर्व प्रश्नांची उत्तरे देऊ. 'वर्ल्ड इटसेल्फ इज पझल' (जग स्वत:च एक कोडे) बनून गेले आहे. आम्ही हे कोडे सोडवले आहे आणि तुम्हाला कोडे पण सोडवून देऊ.

गॉड इज इन एव्हरी क्रिचर व्हेदर व्हिजिबल ऑर इनव्हिजिबल, नॉट इन क्रिएशन. परमात्मा प्रत्येक जीवमात्रात आहे. क्रिएशन (रचने)मध्ये नाही.

**प्रश्नकर्ता :** क्रिएशन कुठून आले ?

**दादाश्री :** क्रिएशन तर मनुष्याच्या अहंकारामधून उत्पन्न झाले आहे. सर्व काही अहंकारातूनच उत्पन्न झाले आहे, कोणी बनविणारा नाही. जगात सहा अविनाशी तत्वे आहेत, त्यांच्या विशेष परिणामामुळे हे जग उत्पन्न झाले आहे.

**प्रश्नकर्ता :** मग जर आम्ही पुन्हा क्रिएशनबद्दल विचार करू की शेवटी हे क्रिएशन कुठून झाले ? कोणत्या तत्त्वांनी याचे क्रिएशन (निर्माण) झाले ?

**दादाश्री :** ते तर मी सांगितले ना, की ओन्ली सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्समुळे हे जग निर्माण झाले आहे. सायंटिफिक (वैज्ञानिक) म्हणजे गुह्य! गुह्य एविडन्स, गुह्य संयोगांमुळे, म्हणजे आपल्याला समजणारही नाही, अशा सर्व संयोगांमुळे हे सर्व बनले आहे. आज तुम्ही मला इथे भेटलात तर तुम्हाला काय वाटते ? की

तुम्ही इथे आलात आणि तुम्हाला 'ज्ञानी पुरुष' भेटले असेच वाटते ना तुम्हाला? या दोनच गोष्टी तुम्ही सांगाल. पण त्यामागे तर शंभर गोष्टी (कितीतरी संयोग) आहेत. तुम्ही फक्त अहंकारच करता की, 'मी आलो.'

**प्रश्नकर्ता :** मग जर अहंकार करायचा नसेल तर ही देवाची इच्छा होती असे म्हणावे का?

**दादाश्री :** नाही, ती देवाची इच्छा नव्हती. देव जर अशी इच्छा करणारा असेल तर देवाला भिकारी म्हटले जाईल. देव तर देवच आहे, वीतराग आहे. देवाला कोणतीच इच्छा होत नसते. देवाकडे तर कशाचीही कमतरता नाही.

## जग चालवायची इच्छा कोणाची?

**प्रश्नकर्ता :** पण असेही म्हणतात ना की, देवाच्या इच्छेशिवाय एक पान देखील हलत नाही.

**दादाश्री :** तर मग चोर चोरी करतो ते पण देवाच्या इच्छेनेच करतो का? देवाच्या इच्छेशिवाय हे सर्व हलतच असते ना? फक्त पानेच नाही, तर ही झाडेसुद्धा हलतच असतात ना! भूकंप पण होतो ना! हे सर्व काय देवाच्या इच्छेने होत असते?

**प्रश्नकर्ता :** जे काही चांगले घडते ते फक्त देवाच्या इच्छेने घडते. आणि वाईट घडते त्यात देवाची इच्छा नसते.

**दादाश्री :** मग वाईट कशामुळे घडते?

**प्रश्नकर्ता :** ते तर आपल्या मनात तशी शंका येते म्हणून आपण असे मानतो.

**दादाश्री :** हे बघा, देव कुठे राहतो ते तुम्हाला माहीत नाही, देव काय करतो तेही तुम्हाला माहीत नाही, तरी पण तुम्ही म्हणता, देवाच्या इच्छेशिवाय एक पानदेखील हलत नाही. मग ही सर्व पाने हलतात ती काय देवाच्या इच्छेविरुद्ध हलतात? देवाची अशी कोणतीच इच्छा नसते. इच्छा असेल त्याला देव म्हणताच येणार नाही. देव तर निरिच्छच आहे.

आम्ही 'ज्ञानी पुरुष' देखील निरिच्छ आहोत, मग देव तर किती निरिच्छ असेल! देवाच्या इच्छेशिवाय एक पान पण हलत नाही, हे तुमच्यासाठी खरे आहे, आणि या जगासाठी पण खरे आहे. पण याहून पुढे गेलो तर या सगळ्या गोष्टी खोट्या ठरतील. खरी गोष्ट तर याहून वेगळीच आहे. ती खरी गोष्ट पुस्तकात सामावू शकत नाही. ती तर अवर्णनीय आहे. अव्यक्त आहे. हे सगळे लोक काय म्हणतात? पैसे कमावले तर ते आम्ही कमावले आणि नुकसान झाले तर देवाने केले. नुकसान झाल्यावर मात्र असे म्हणत नाहीत की, 'हे नुकसान मी केले.' 'देवाने बिघडवले, आमचा भागीदार चांगला नाही', असेच म्हणतात. नाहीतर 'आमचे ग्रह चांगले नाहीत, किंवा मुलाचे लग्न होऊन सून घरी आली त्या दिवसापासूनच आम्ही सर्व दु:खी झालो आहोत, तिचा पायगुण चांगला नाही.'

असे कितीतरी आक्षेप घेतात. पुन्हा मनुष्य जन्मच मिळणार नाही असे आक्षेप घेतात. असे करू नये. कोणावरही आक्षेप घेऊ नये. आपल्यामुळे कोणालाही दु:ख होता कामा नये. जेव्हा पुण्याचा उदय असेल तेव्हा तुम्ही काहीही केले तरी सगळे चांगलेच होते आणि पापाचा उदय असेल तेव्हा चांगले करूनही वाईट होते.

देव अशी प्रेरणा देत नाही. तो जर प्रेरणा देणारा असता तर सगळे चोर असेच म्हणतील की देवाने आम्हाला प्रेरणा दिली आहे. चोरी करण्याची प्रेरणा आणि दान देण्याची प्रेरणा देणारा देव असूच शकत नाही. जो चोरी करण्याची प्रेरणा देतो, दान देण्याची प्रेरणा देतो त्याला देव कसे म्हणता येईल? जो करवितो त्याला देव म्हणूच कसे शकतो? पण लोक तर देवच प्रेरणा देतो असेच म्हणतात.

देवाबद्दल लोक वेगवेगळे बोलतात. काही लोक तर देव कर्माचे फळ देणारा आहे, असेही म्हणतात. अरे, कर्म मी करणार आणि फळ देव देणार? (असे कसे?) त्यापेक्षा तर चांगले केले तरी देवाने केले आणि वाईट केले तरीही देवानेच केले, असे म्हणा ना!

**प्रश्नकर्ता :** परंतु मी असे म्हणतो की चांगले तर देव करवितो आणि वाईट सैतान करवितो?

**दादाश्री :** सैतान या जगात नाहीच मुळी. दोन प्रकारची बुद्धी असते. एक सद्बुद्धी आणि दुसरी दुर्बुद्धी. तर त्या दुर्बुद्धीलाच सैतान म्हटले जाते, आणि सद्बुद्धीला देव म्हटले जाते.

**प्रश्नकर्ता :** अगदी बरोबर आहे.

**दादाश्री :** हो, देव काहीच करत नाही. तो तर वीतराग आहे. देव यात हात घालतच नाही. फक्त त्याच्या उपस्थितीमुळे हे सर्व चालत आहे. तो उपस्थित नसेल तर हे चालणार नाही. या शरीरात त्याची उपस्थिती आहे, म्हणूनच हे सर्व चालत आहे. तो काहीच करत नाही. तो फक्त प्रकाश देतो. ज्याला चोरी करायची असेल त्यालाही प्रकाश देतो आणि ज्याला दान द्यायचे असेल त्यालाही प्रकाश देतो. देव दुसरे काहीच करत नाही.

## भगवंत, इच्छाशक्तीवाला?

आम्हाला कोणत्याही वस्तूची गरज नाही. आम्ही कोणत्याच वस्तूची इच्छा करत नाही, तरी आमच्याकडे सर्व काही आपोआपच येत असते.

**प्रश्नकर्ता :** तेही करून पाहिले की कोणत्याही वस्तूची इच्छा करायची नाही, तर ती वस्तू स्वतःच माझ्याकडे येईल, पण तरीही येत नाही.

**दादाश्री :** हो, कारण त्यासाठी क्रेडिट साइडमध्ये (पुण्याच्या खात्यात) काही तरी शिल्लक हवी ना? आम्ही इच्छा करत नाही तरी आम्हाला सर्व काही मिळते. म्हणजे आमची क्रेडिट साइट (पुण्याई) किती मोठी आहे!

इच्छा करणाऱ्याला शास्त्रांत काय म्हणतात? त्याला भिकारी म्हणतात. कित्येक माणसे पैशांसाठी भिकारी आहेत, कित्येक स्त्री-विषयासाठी भिकारी आहेत, कित्येक मानासाठी भिकारी आहेत, कित्येक कीर्तीसाठी भिकारी आहेत, कोणी मंदिर बांधण्यासाठी भिकारी आहे. सगळीकडे भीक, भीक, आणि भीकच आहे.

आम्हाला कोणत्याही प्रकारची भीक (तिव्र इच्छा) नाही, म्हणून

तर साऱ्या जगाचा लगाम आमच्या हातात आहे. ज्याला कोणत्याच प्रकारची भीक नसते त्याला ते पद प्राप्त होते. जे पद आम्हाला प्राप्त झाले आहे, ते पद तुम्हालाही प्राप्त होऊ शकते. परंतु भीक असलेल्याला मात्र प्राप्त होत नाही.

**प्रश्नकर्ता :** भीक मागूनही आम्हाला मिळत नाही ना?

**दादाश्री :** हो, बरोबर. कारण त्यासाठी लागणारी क्रेडिट साइड तुमच्याजवळ नाही. सर्वात आधी क्रेडिट असले पाहिजे. जितके क्रेडिट आहे, तितक्या बाबतीत तुम्हाला अडचण येत नाही. यात देवाची इच्छा नसते. देव तर देवच आहे.

**प्रश्नकर्ता :** तर मग इच्छाशक्ती, क्रियाशक्ती, ज्ञानशक्ती या कोणाच्या आहेत ?

**दादाश्री :** ह्या शक्ती देवाच्या नाहीत. यातील कोणतीच शक्ती देवात नसते. देवात इच्छाशक्तीही नाही, क्रियाशक्तीही नाही आणि ज्ञानशक्तीही नाही. तिन्ही प्रकारच्या शक्ती देवामध्ये नाहीत. देव तर केवळ विज्ञानशक्ती आहे, बस!

## अंत, जगाचा की 'व्यवहारा'चा?

**प्रश्नकर्ता :** हे जग कसे उत्पन्न झाले? सर्व प्रथम काय उत्पन्न झाले होते?

**दादाश्री :** सर्व प्रथम असे काही नव्हतेच. हे सर्व असेच चालत आले आहे, अनादिपासून असेच चालत आहे. जो सर्व प्रथम असेल त्याचाही अंत होत असतो. अर्थात जगाचा आरंभ पण नाही आणि अंत पण नाही.

**प्रश्नकर्ता :** जर एखादी वस्तू या जगात उत्पन्न झाली तर त्या पूर्वी त्याचे बीज तर जगात असेलच ना?

**दादाश्री :** ही तर बुद्धीजन्य गोष्ट आहे, ज्ञानजन्य नाही. खुदाच्या (देवाच्या) ज्ञानात कोणीच प्रथम नव्हता.

**प्रश्नकर्ता :** पण खुदाने माती, पाणी, अग्नी आणि हवा, या

चारींना एकत्र करून माणसाला उत्पन्न केला आहे ना?

**दादाश्री :** नाही, खुदा जर असे माणसाला बनवील तर मग तो मजूरच होईल ना, मग मजूर आणि खुदा यात काय फरक राहिला? अरे, अवलियाही कधी मजुरी करत नाही.

**प्रश्नकर्ता :** तर मग हे जग आहे तरी काय?

**दादाश्री :** तुम्ही जग कशाला म्हणता? डोळ्यांनी जे दिसते, कानांनी जे ऐकू येते, नाकाने, जिभेने आणि स्पर्शाने, तुमच्या पाच इंद्रियांनी जे अनुभवास येते, त्यालाच तुम्ही जग म्हणता ना? ते सर्व तर रिलेटिव्ह आहे आणि ऑल दीज रिलेटिव्हस् आर टेम्पररी ॲडजस्टमेंटस् (सापेक्ष सर्व तात्पुरत्या ॲडजस्टमेंट असतात).

**प्रश्नकर्ता :** या जगाचा शेवट आहे का?

**दादाश्री :** नाही, या जगाचा कधीच शेवट होत नाही. परंतु तुम्ही ज्या समसरण मार्गावरून चालत आहात, त्याचा मात्र शेवट होईल. तुम्ही जितके मैल चालता, तितके मैल कमी होतात आणि मग त्याचा शेवट पण असतो.

**प्रश्नकर्ता :** त्याचा शेवट कसा असतो?

**दादाश्री :** शेवटी तुम्ही पर्मनन्ट (अविनाशी) होऊ शकता. आता तर तुम्ही टेम्पररी (विनाशी) आहात, कारण 'मी रवींद्र आहे, मी डॉक्टर आहे', अशा सर्व तुमच्या रॉंग बिलीफस् (चुकीच्या मान्यता) आहेत.

**प्रश्नकर्ता :** मृत्यूनंतर सर्व कुठे जातात?

**दादाश्री :** जो इथे अकराव्या मैलावर आहे, तो बाराव्या मैलावर जातो. इथे दहाव्या मैलावर असेल तो अकराव्या मैलावर जातो. इतर कुठेही जात नाही, हाच रस्ता आहे. जितका रस्ता त्याने ओलांडला तितका तो पुढे जातो. तो पुढेच जात राहतो. नंतर जेव्हा हा रस्ता पूर्ण होतो, तेव्हा तो स्वतंत्र होतो. तोपर्यंत मात्र स्वतंत्र नसतो, परवशच (परतंत्रच) असतो (अवलंबूनच राहतो).

तुमचा कोणी बॉस (मालक) आहे का? बॉस असेपर्यंत जीवनात किती त्रास असतो? किती पारतंत्र्य असते?

**प्रश्नकर्ता :** आवडत तर नाही.

**दादाश्री :** हो, म्हणजे इंडिपेंडन्ट लाईफ (स्वतंत्र जीवन) हवे असते. हे जग कुणी बनविलेले नाही. द वर्ल्ड इज दी पझल इट सेल्फ, गॉड हॅज नॉट पझल्ड धीस वर्ल्ड ॲट ऑल. हे जग स्वत:च एक पझल (कोडे) बनले आहे. तुम्हाला पझल वाटते की नाही? कोणी म्हटले, 'रवींद्र चांगला माणूस नाही,' हे ऐकताक्षणीच तुमच्या आत काही पझल सुरू होते की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो, होते ना?

**दादाश्री :** पझल का उत्पन्न होते? कारण हे जग स्वत:च एक पझल (कोडे) आहे.

## दुर्घटना म्हणजे काय?

**प्रश्नकर्ता :** जर देवाची इच्छा मानली तर दुर्घटना असे काही नसतेच.

**दादाश्री :** हो, पण कधी दुर्घटना घडत असते का?

या जगात दुर्घटना कधी घडतच नाही. ज्याला समज नाही असा माणूसच म्हणतो की दुर्घटना घडत असतात. परंतु जो समजूतदार आहे तो तर कधीच म्हणणार नाही की 'अरेरे, दुर्घटना घडली.' ज्याची समज कच्ची आहे तोच बोलतो की, ही दुर्घटना घडली!! खरी समज असलेला तर असे कधीच बोलणार नाही. दुर्घटना कधी घडतच नसते. तुम्हाला काय वाटते, दुर्घटना घडते का कधी?

दुर्घटना कशाला म्हणतात? ॲन इंसिडंट हॅज सो मेनी कॉजेस ॲन्ड ॲन ॲक्सिडंट हॅज टु मेनी कॉजेस. अर्थात दुर्घटना (सर्व साधारणपणे) कधी घडतच नाही. एखादी दुर्घटना घडण्यासाठी तर अत्याधिक प्रमाणात कॉजेस (कारणे) लागतात. आणि 'इंसिडंट' (घटना)

साठी कमी कॉजेस लागतात. दिवसभर इंसिडंटच होत असतात. कधीतरीच जास्त कॉजेस असतात त्याला ॲक्सिडंट म्हणतात.

मुंबईमध्ये हाय-वे क्रॉस करताना जर एखाद्या माणसासमोर गाडी आली तर त्या गाडीचा ड्रायव्हर काय म्हणेल की, माझ्या प्रयत्नांमुळे हा वाचला. पण तो माणूस तर म्हणतो, मी पटकन अशी उडी मारली, त्यामुळे वाचलो. या दोघांचेही म्हणणे चुकीचे आहे. थोडे पुढे गेल्यावर तोच ड्रायव्हर दुसऱ्या एखाद्या माणसाचा पाय मोडतो. मग तो कसला वाचविणारा ?

(सर्व साधारण) ॲक्सिडंट कधी होतच नाही. लोकांना हे माहीत नाही म्हणून ॲक्सिडंट झाला असे म्हणतात. दिवसभर इंसिडंट होत असतात.

## हे जग, योजनाबद्ध की ॲक्सिडंट ?

मनुष्याने कितीही अहंकार केला, परंतु निसर्गाचे जे प्लॅनिंग (योजना) आहे, त्याला कोणीच बदलू शकत नाही. जर प्लॅनिंग बदलता आले असते तर या दुनियेत एकसुद्धा स्त्री उरणार नाही. सर्व स्त्रिया पुरुष बनून जातील. परंतु हे कोणाच्याच हातात नाही.

निसर्गाचे जे प्लॅनिंग आहे, त्या प्लॅनिंगच्या हिशोबानेच सर्व काही होत असते. निसर्गाचे प्लॅनिंग म्हणजे काय, तर हिंदुस्तानात इतक्या स्त्रिया पाहिजेत, इतके पुरुष पाहिजेत, इतके केस कापणारे पाहिजेत, इतके सुतार पाहिजेत, इतके लोहार पाहिजेत. प्लॅगिंनमध्ये प्रत्येक गोष्ट अशी प्रमाणात असते. आणि ते कोणीही बदलू शकत नाही.

**प्रश्नकर्ता :** मग हे कोण ठरवतो ?

**दादाश्री :** ओन्ली सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्स (फक्त वैज्ञानिक सांयोगिक प्रमाण) आहेत. हिंदुस्तानात इतके सैनिक पाहिजेत, इतके पोलिसवाले पाहिजेत, नाहीतर पोलिसाची नोकरी कोणी करणारच नाही. इतके घर बनविणारे पाहिजेत. इतके वकील पाहिजेत. इतके डॉक्टर पाहिजेत. डॉक्टरांची कमाई खूप चांगली असते म्हणून मग

सगळेच डॉक्टर बनतील. पण सगळेच काही डॉक्टर बनू शकत नाहीत. जे निसर्गाच्या प्लॅनिंगमध्ये नाही, ते कोणी करणार नाही. देव देखील त्यात बदल करू शकत नाही. प्लॅनिंग म्हणजे प्लॅनिंग!! त्या प्लॅनिंगमध्ये सर्व काही असते. निसर्गाच्या प्लॅनिंगमुळे या जगात प्रत्येक वस्तू आहे. पण आपल्या प्रारब्धात नसेल तर ते आपल्याला मिळत नाही. नाहीतर प्रत्येक वस्तू, ज्या तुमच्या आहेत त्या सर्वच वस्तू इथे आहेत. निसर्गाचे प्लॅनिंग खूपच चांगले आहे. त्यात कधी कोणी भर घालू शकत नाही आणि त्या प्लॅनिंगप्रमाणेच सर्वांना राहावे लागते. परंतु अहंकार केल्यामुळे दुःख भोगावे लागते. जो अहंकार करतो, त्याला दुःख भोगावे लागते. तरी पण प्लॅनिंगमध्ये कोणताच बदल होत नाही.

**प्रश्नकर्ता :** समजा, एअर इंडियाचे एक विमान कोसळले, त्यात 215 माणसे मरण पावली, तर त्यातही काही प्लॅनिंग असेल का?

**दादाश्री :** हो, सर्व प्लॅनिंगच आहे. प्लॅनिंगच्या बाहेर तर काही होतच नाही. प्लॅनिंगशिवाय कोणतीच गोष्ट घडत नाही. एक्जेक्ट प्लॅनिंग आहे! असा ॲक्सिडंट पाहून लोकांना आश्चर्य वाटते की, अरे! हे काय झाले, हे काय झाले? परंतु प्राण्यांना तर त्याचे काहीच आश्चर्य वाटत नाही. किती तरी गाई हे (ॲक्सिडंट) पाहतात, गाढवे देखील पाहतात, परंतु त्यांना काहीच आश्चर्य वाटत नाही. ते तिथे थांबतच नाही, सरळ पुढे निघून जातात. गाय, गाढव हे सगळेच मान्य करतात की हे जे काही घडले आहे ते प्लॅनिंगप्रमाणेच घडले आहे, त्यात काय पाहायचे!

## ज्योतिषज्ञानाची सत्यता

**प्रश्नकर्ता :** तर मला ज्योतिषाचा अर्थ काय आहे ते समजून घ्यायचे आहे, तर आपण कृपा करावी.

**दादाश्री :** हे जग देव चालवत नाही, तर दुसरी एक शक्ती आहे ती चालवते. त्यामुळे आपले ज्योतिषज्ञान करेक्ट (बरोबर) आहे. देव जर चालवत असेल तर कुणी एखाद्याने देवाची खूप भक्ती केली तरी ज्योतिष चुकीचे ठरेल. ज्योतिष तर अगदी बरोबर आहे, पण (यथार्थ) ज्योतिष जाणणारे खूप कमी आहेत. ते पूर्णपणे जाणत नाहीत.

जो भावाभाव आहे ना, ते सर्व त्यांना समजत नाही. स्पष्टपणे समजत नाही. नाहीतर ज्योतिष तर खरेच आहे. ते तर विज्ञान (शास्त्र) आहे.

संपूर्ण जगाची माणसे 'भोवरे' आहेत. ते स्वत: कोणतेच कर्म बांधू शकत नाहीत. स्वत: जर कर्म बांधणारा असेल तर तो अशी कर्मे बांधणारच नाही. त्यामागे निमित्त आहे. या जगात कोणाला शौचाला जाण्याचीही (स्वतंत्र) शक्ती नाही. जेव्हा त्याला शौचाला होणार नाही ना, तेव्हा समजेल की ती आपली स्वत:ची स्वतंत्र शक्ती नव्हती. तेव्हा मग डॉक्टरांची गरज लागते.

**प्रश्नकर्ता :** मी असे समजतो की हे सर्व चालविणारी जी दुसरी शक्ती आहे, ती ग्रहमान शक्ती आहे?

**दादाश्री :** हे सर्व पार्लमेंटरी शक्ती चालवत असते. आत्म्याच्या उपस्थितीमुळे ही पार्लमेंट (आपल्या आतील संसद) चालत आहे. पार्लमेंटमध्ये त्याच्यावर खटला चालतो. की, 'या माणसाच्या हातून असे नैमित्तिक कर्म घडले आहे.' मग पार्लमेंटमध्ये त्याच्यावर खटला चालतो. नंतर पार्लमेंट जो निर्णय घेते, त्यानुसार त्याला फळ मिळते.

खरे तर ग्रहमान शक्ती चालवते, ही गोष्ट देखील खरी नाही. परंतु जी शक्ती चालवते, ती तर दुसरीच शक्ती आहे. ग्रहमान तर त्या शक्तीच्या अधिकाराने चालत असते. जसे पार्लमेंटच्या आदेशानुसार कलेक्टर काम करतो, त्याचप्रमाणे ते सर्व ग्रह काम करतात. पाहा ना, आमचे सर्व ग्रह निघूनच गेले आहेत, म्हणून आमच्यासाठी कोणतेही ग्रह काम करत नाहीत. आम्हाला कोणतेच ग्रह स्पर्श करत नाहीत. पण ती शक्ती मात्र आम्हाला स्पर्श करते. आमच्यावर ग्रहांचा मात्र अधिकार नाही. पण त्या दुसऱ्या शक्तीचा डायरेक्ट अधिकार आहे. पण या ग्रहांचा अधिकार नाही. तुमच्या आत आणि या सगळ्यांच्या आत ग्रह असतात. आमच्यात कोणताही ग्रह नाही. आम्हाला दुराग्रह नाही, मताग्रह नाही, हठाग्रह नाही, कदाग्रह नाही. नव ग्रहातील कोणताही ग्रह आमच्यात नसतो. आमच्यावर सगळे ग्रह प्रसन्न असतात. ते सगळे आमच्याशी मित्रासारखे वागतात.

**प्रश्नकर्ता :** हे सर्व ग्रह, तारे, म्हणजे काय?

**दादाश्री :** ते सर्व देवलोक आहेत. त्यांना ज्योतिष्क देव म्हणतात. देवगतीत आयुष्यभर क्रेडिट (चांगले फळ)च मिळते, तिथे डेबिट (वाईट फळ) नसते. तिथे खूप इंद्रियसुखे आहेत, पण सनातन सुख मात्र नाही.

**प्रश्नकर्ता :** आम्हाला तर खरे सुख हवे आहे.

**दादाश्री :** खरे सुख तर, सेल्फ रियलाइजेशन (आत्मसाक्षात्कार) झाल्यावरच मिळते, सनातन सुख मिळते.

## तुम्ही काय करू शकता?

तुम्ही सकाळी झोपेतून उठल्यावर काय काय करता?

**प्रश्नकर्ता :** उठल्यावर अंघोळ, नाश्ता-पाणी वगैरे करतो, नंतर इतर सर्व कामे तर करावीच लागतात ना?

**दादाश्री :** म्हणजे ती सर्व कामे दिवसभर तुम्हीच करत असता?

**प्रश्नकर्ता :** होय, करावीच लागतात ना?

**दादाश्री :** नाही, पण ती कामे तुम्ही करता की तुम्हाला करावी लागतात?

**प्रश्नकर्ता :** मीच करतो.

**दादाश्री :** पण तुम्हीच करता की दुसरे कोणी तुमच्याकडून करवून घेते?

**प्रश्नकर्ता :** कोणी करवून घेत नाही.

**दादाश्री :** म्हणजे तुम्हीच करता? मग कधी तरी तुमची तब्येत बिघडल्यामुळे संडास होणे थांबते, तेव्हा तुम्ही काही करू शकता का?

**प्रश्नकर्ता :** ते तर शरीराचे आहे, आणि शरीरावर इतके नियंत्रण ठेवणे हे तर फार कठीण आहे.

**दादाश्री :** ठीक तर, शरीरावर नियंत्रण नाही. चला मग, ही गोष्ट जाऊ द्या, पण कधी झोप लागत नाही तेव्हा तुम्ही प्रयत्न केल्यावर झोप लागते का?

**प्रश्नकर्ता :** जर नीट प्रयत्न केले तर झोप येते.

**दादाश्री :** या जगात असा कोणीही मनुष्य जन्माला आला नाही की ज्याला शौचाला जाण्याचीही स्वतंत्र शक्ती असेल. लोक भ्रांतीमुळे असे बोलतात की 'मी हे केले, मी हे केले.' ती सर्व भ्रांती आहे, खरी गोष्ट नाही. तेव्हा खरे काय ते समजून घ्यायला हवे. ते कसे बरे समजेल? तर ते कोणत्या व्ह्यू पॉइंटने (दृष्टीकोनाने) समजणार नाही.

'हा मी आहे, हे मी केले', तो सर्व अहंकार आहे, आणि करणारा तर कोणी दुसराच आहे. देव पण करत नाही आणि तुम्ही पण करत नाही. ते जर जाणून घ्यायचे असेल तर मी तुम्हाला वास्तविक काय आहे ते सांगतो, नाहीतर तुम्ही जे जाणता तेच सांगेन. की देव पण करतो आणि तुम्ही पण करता.

**प्रश्नकर्ता :** नाही, आम्ही तर काहीच करत नाही.

**दादाश्री :** तर मग तुमचा धंदा तुम्ही करत नाही तर कोण करतो?

**प्रश्नकर्ता :** पण आम्ही तर देवाच्या हातची खेळणी आहोत, जशी त्याची इच्छा तसे तो आमच्याकडून करवून घेतो.

**दादाश्री :** नाही, नाही, यु आर नॉट टॉय्ज् ऑफ गॉड! (तुम्ही देवाच्या हातची खेळणी नाही.)

**प्रश्नकर्ता :** मग काय आहोत?

**दादाश्री :** यु यूअर सेल्फ इज गॉड! यु डोन्ट नो युवर एबिलीटी, युवर नॉलेज!!! (तुम्ही स्वत:च परमात्मा आहात! तुम्ही तुमच्या शक्तीबद्दल, ज्ञानाबद्दल जाणतच नाही!) हे तुम्हाला माहीतच नाही, म्हणूनच 'मी देवाच्या हातचे खेळणे आहे', असे तुम्ही म्हणता.

खरी फिलॉसॉफी (तत्त्वज्ञान) समजाल तर ही अत्यंत गूढ फिलॉसॉफी आहे.

हिंदू धर्मवाला पण बोलतो 'मी केले', मुस्लिम धर्मवाला पण बोलतो 'मी केले', जैन धर्मवाला पण बोलतो 'मी केले', सगळे जण 'मी केले' असेच बोलतात. परंतु तथ्य तसे नाही.

इथे तर, तुम्ही कधी ऐकलीही नसेल, कोणत्याही पुस्तकात लिहिलेली नसेल, अशी नवीनच माहिती आहे. पूर्वी कधी घडले नव्हते, ते आज घडले आहे. दहा लाख वर्षांत कधी घडले नव्हते ते आता घडले आहे. आत्तापर्यंत सगळ्यांनी हेच सांगितले की 'हे करा, हे करा, हे करा' परंतु जिथे काही 'करायचे' असेल तिथे मोक्ष नसतो आणि जिथे मोक्ष आहे तिथे काहीच 'करायचे' नसते.

तुम्ही काय करता ? दिवसभर काही मेहनत करता का ?

**प्रश्नकर्ता :** मेहनत तर करतोच ना ?

**दादाश्री :** कसली मेहनत करता ? कोणीच मेहनत करत नाही. मग काय करतात ? तर फक्त अहंकारच करतात की, 'हे मी केले.' मेहनत तर तो बैल करतो. कोणी मनुष्य मेहनत करतो का ? तुम्ही पाहिले आहे का ?

**प्रश्नकर्ता :** मग आम्ही ऑफिसला जातो, काम करतो, ते सर्व काय आहे ?

**दादाश्री :** ही तर रॉंग बिलीफ (चुकीची मान्यता) आहे की, 'मी करतो.' हे तर ऑटोमॅटिक (आपोआपच) होत असते. संडास तुम्ही करता की आपोआप होत असते ?! लोक बोलतात, 'मी संडासला गेलो होतो.' तुम्ही झोप घेता की झोप आपोआपच येते ?

**प्रश्नकर्ता :** आपोआपच येते.

**दादाश्री :** मग उठायच्या वेळी तुम्ही उठता की कोणी तुम्हाला उठवते ?

**प्रश्नकर्ता :** आपोआप उठतो.

**दादाश्री :** होय, म्हणजे हे तुमच्या हातात नाही. पण मग तुमच्या हातात काय आहे? तुम्ही तर फक्त अहंकार करता की, 'मी हे केले, मी झोपलो.' मग कधी म्हणता, 'मला तर आज झोपच लागली नाही.' म्हणजे हा सर्व विरोधाभास आहे. 'मी सकाळी लवकर उठतो', असे बोलता, मग घड्याळ का ठेवता? आणि म्हणता, 'मी खाल्ले.' ओहोहो! आला मोठा खाणारा!!! ते तर दात चावतात, जीभ स्वाद घेते आणि हे हात काम करतात, हे सर्व मेकॅनिकली (यंत्रवत) होत असते. आणि तुम्ही फक्त अहंकारच करता.

**प्रश्नकर्ता :** मग मी काय करतो?

**दादाश्री :** तुम्ही काहीच करत नाही. तुम्ही फक्त काम बिघडवता (अहंकार करून).

## अनंत शक्तीवाला, बंधनात

हे सर्व मेकॅनिकली (यंत्रवत) होत असते. लग्न करतो, तेसुद्धा मेकॅनिकली होऊन जाते. मुलगा होतो, तोसुद्धा मेकॅनिकली होतो. तुम्ही 'स्वतः' कोण आहात, हे जर रियलाइज झाले, की मग तुम्ही मेकॅनिकल राहणार नाही. तुम्ही स्वतः करता की देव करतो, याचा शोध तर घ्यायला हवा ना? जर तुम्ही स्वतः करत असाल तर प्रत्येक गोष्ट तुमच्या इच्छेनुसार घडायला हवी. असे 100 टक्के घडते का?

**प्रश्नकर्ता :** 100 टक्के तर घडत नाही.

**दादाश्री :** हो, म्हणजे तुम्ही स्वतः कर्ता नाही. परंतु तुम्हाला असे वाटते की मीच कर्ता आहे.

**प्रश्नकर्ता :** देव करवून घेतो.

**दादाश्री :** नाही, हे देव पण करवून घेत नाही. देव जर करवून घेत असेल तर सर्व चोर म्हणतील 'आम्हाला देवच प्रेरणा देतो.' अरे बाबा, देव अशी प्रेरणा देतच नाही. तो यात हात घालतच नाही.

## व्यवहार-जगात, आपली सत्ता किती ?

तुमची इच्छा नसूनही तुम्ही कर्म बांधता, कारण तुम्ही असे मानता की 'मी करतो, आणि हे मीच केले, हे मीच केले.'

**प्रश्नकर्ता :** मग जो मनुष्य सर्व प्रथम जन्मला असेल त्याला तर कोणतेच कर्म नसेल न ?

**दादाश्री :** कोणी प्रथम जन्मलेलाच नाही. या जगात प्रथम-नंतर अशी कोणतीच गोष्ट नाही. या वर्तुळात प्रथम कोण ? यात कोणीही प्रथम नाही, आदि नाही, अंत नाही. सर्वच अनादि-अनंत आहे. कोणी सर्व प्रथम जन्मला आहे ही गोष्ट तर बुद्धीजन्य आहे. बुद्धीने याचे समाधान मिळत नाही, ज्ञानानेच समाधान मिळते. सहा अविनाशी तत्त्वे आहेत. या सहा तत्त्वांचे निरंतर समसरण होत असते, म्हणजेच परिवर्तन होत असते. यामुळे सर्व अवस्था निर्माण होतात, आणि ह्या सर्व अवस्था विनाशी आहेत.

सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्स म्हणजे नक्की काय ? तर वेळ, स्पेस (जागा), कर्माचे फळ, हे सर्व एकत्रित आल्यावर फाशीची शिक्षा होते. शिक्षा देणे हे न्यायाधीशाच्या हातात नसते. कोणी मनुष्य असा जन्मलेला नाही की ज्याच्या हाती स्वतंत्र शक्ती आहे, कारण ही सारी परशक्ती आहे. निसर्ग जेव्हा तुमच्या फेवर (पक्ष)मध्ये असतो तेव्हा तुम्ही असे मानता की, 'मी केले, मी कर्ता आहे.'

जिथे काही करण्याचे असते, तिथे भ्रांती वाढते. मग जे काही करतो त्याने भ्रांती वाढत जाते. 'ज्ञानी पुरुष' भेटल्यावर करायचे काहीच नसते. केल्याने भ्रांती वाढत जाते. जप केले तर भ्रांती वाढते. तप केले तर भ्रांती वाढते. उपवास केला तर भ्रांती वाढते. पुस्तक वाचत राहिला तर भ्रांती वाढते. आम्ही हे केले, आम्ही ते केले, ही सर्व भ्रांती आहे. 'ज्ञानी पुरुषां'ची कृपा प्राप्त झाली की मग 'करायचे' काहीच नाही, मग सर्व काही सहजरित्या होत राहते.

कोणी मनुष्य जेवण जेऊच शकत नाही. फक्त अहंकारच करतो

की मी जेवलो. मग आजारी का पडतो? आजारी पडतो तेव्हा का खाऊ शकत नाही? मग आधीचा खाण्याचा प्रयत्न हा तुमचाच होता का? आधी खात होता मग आता का खात नाही? असा कधी विचारच केला नाही ना? हे सर्व निसर्गच चालवत असतो. देव चालवत नाही. रात्री तुम्ही झोपून जाता तेव्हासुद्धा हे जग चालतच असते ना! जग क्षणभरही थांबत नाही. एखादा माणूस दारू पिऊन जमिनीवर पडला तरीही जग चालू राहते. तुम्ही कधी ब्रँडी प्यायली होती का?

**प्रश्नकर्ता :** होय.

**दादाश्री :** त्यावेळी सुद्धा हा संसार चालतच असतो थांबत नाही. तुम्ही दारू पिऊन तुमच्याच धुंदीत असता, तरी पण जग चालतच असते, ते कधी थांबत नाही.

संसार व्यवहार हा तुमच्या जन्माआधी पण चालत होता आणि तुमच्या मरणानंतरही चालतच राहील. संसार व्यवहार तर सापेक्ष आहे. लोक काय म्हणतात, 'आम्ही नसतो तर काय झाले असते? हे जग असे झाले असते.'

हे सर्व बॉदरेशन (चिंता) सोडून द्या. ही अहंकाराची चिंता आहे. आम्ही हे करतो, आम्ही मुलांना मोठे केले, आम्ही मुलांना शिकवतो, आम्ही हे केले, आम्ही ते केले, हा सर्व अहंकार आहे. एका माणसाने गायीला मारण्याचा विचार केला आणि एका माणसाने गायीला वाचविण्याचा विचार केला, तर देवाकडे कोणत्या माणसाची किंमत जास्त असेल? देव काय म्हणतो, 'इथे कोणाचीही किंमत नाही. तू मारण्याचा अहंकार करतोस, आणि तो वाचविण्याचा अहंकार करतो. आमच्याकडे अहंकारवाला चालणार नाही.' 'मी हे त्यागले' असा अहंकार करू नये. अनंत जन्म हेच तर केले आहे ना? याचा काय फायदा? तर रिलेटिव्ह फायदा आहे. मनुष्यातून देवगतीत जातो. पण रियलचा फायदा मिळणार नाही. रियल फायदा तर मुक्त पुरुष भेटले, मोक्षदाता पुरुष भेटले आणि मोक्षाचे दान मिळाले तर काम होईल.

एका ब्राह्मणाला दोन मुले होती. एक तीन वर्षाचा आणि एक दीड वर्षाचा. तो ब्राह्मण मरण पावला आणि त्याची बायको पण वारली. गावातील इतर कोणी ब्राह्मण त्या मुलांना आपल्याकडे ठेवायला तयार होईना. त्याच गावात एक क्षत्रिय होता, त्याला मूल नव्हते. तो म्हणाला, 'आम्हाला एक मूल द्या'. तेव्हा गाववाल्यांनी मोठ्या मुलाला दिले. त्या दुसऱ्या दीड वर्षाच्या मुलाला घेण्यास कोणी तयार होईना. नंतर एक हरिजन म्हणाला, 'आम्हाला मूलबाळ नाही, तेव्हा आम्हाला द्याल तर खूपच मेहरबानी होईल!' तेव्हा गावकऱ्यांनी विचार केला बिचारे हे मूल मरून जाईल, त्यापेक्षा त्याला हरिजनाकडे दिलेले बरे, तो जगेल तरी. मग त्या दुसऱ्या मुलाला तो हरिजन घेऊन गेला.

दोन्ही मुले मोठी होऊ लागली. क्षत्रियाकडचा मुलगा वीस वर्षाचा झाला तर हरिजनाकडचा अठरा वर्षाचा झाला. हरिजनाकडचा मुलगा काय करायचा? तर दारू बनवायचा. स्वत: दारू प्यायचाही आणि विकायचाही. जो मुलगा क्षत्रियाजवळ होता त्याला समजले होते की दारू पिणे वाईट आहे, ही काही चांगली गोष्ट नाही. दोन्ही भाऊ ब्राह्मण होते. परंतु एकाला हरिजनाचा संयोग मिळाला आणि दुसऱ्याला क्षत्रियाचा चांगला संयोग मिळाला. एखाद्या माणसाने देवाला विचारले की या दोन्हींपैकी चांगला कोण? तेव्हा देवाने सांगितले एक दारू प्यायची नाही असा अहंकार करत आहे, आणि दुसरा दारू पिण्याचा अहंकार करत आहे. मोक्षासाठी दोन्हीही उपयोगी नाहीत. ते स्वत:च्या जबाबदारीवर करतात. जो दारू पिण्याचा अहंकार करतो, ती त्याची स्वत:ची जबाबदारी आहे. आणि न पिण्याचा अहंकार करतो तीसुद्धा त्याची स्वत:चीच जबाबदारी.'

खऱ्या गोष्टीचे उत्तर नक्कीच मिळाले पाहिजे. तर मग शंका राहणार नाही.

आम्ही सांगतो की हे सर्व फक्त सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्स आहेत. यात देवाला काहीच करावे लागत नाही. सहज संयोग जुळून येतात आणि काम होते. सायंटिफिक (वैज्ञानिक) पद्धतीनेच होत

असते पण माणूस काय बोलतो, 'हे मी केले, ते मी केले.' तो फक्त अहंकार आहे.

**प्रश्नकर्ता :** अहंकार नसावा हे ठीक आहे, पण काही ना काही प्रवृती तर करावीच लागेल ना? केल्याशिवाय तर काहीच होणार नाही ना!

**दादाश्री :** दुसरी शक्ती तुमच्याकडून प्रवृती करवून घेत असते. त्यात तुम्ही अहंकार करण्याची गरजच नाही. ती शक्तीच सर्व काही करवून घेते. तुम्हाला फक्त 'काय होत आहे' हे पाहण्याचीच गरज आहे. सर्व कामे करावीत आणि बोलावेसुद्धा की 'हे मी केले' परंतु ड्रॅमॅटिक (नाटकीय) बोलावे. परंतु बिलीफ (मान्यते)मध्ये 'हे मी केले' असे नसावे. हे जे बिलीफमध्ये राहते की 'हे मी केले' तीच चूक आहे. जसे नाटकात कोणी भर्तृहरिचा अभिनय करतो. परंतु तो मनात जाणत असतो की, मी लक्ष्मीचंद आहे. तो हे विसरतच नाही. तो जाणतो की 'मी लक्ष्मीचंद आहे', म्हणून भर्तृहरिच्या नाटकात त्याला राग-द्वेष होत नाहीत. त्याचप्रमाणे स्वत:ला ओळखले की मग राग-द्वेष होणार नाहीत. हे सर्व नाटकच आहे. स्वत: पर्मनन्ट आहे आणि ड्रामा (अभिनय) करतो. इथे कोणाचा मुलगा बनून येतो आणि हे नाटक पूर्ण झाल्यावर कोणा दुसऱ्याकडे नाटक करील, नंतर तिसऱ्याकडे नाटक करील. 'द वर्ल्ड इज द ड्रामा इटसेल्फ' (हे जग स्वत:च एक नाटक आहे) समजले ना? आता तुम्ही रवींद्रची भूमिका करत आहात. ह्या नाटकात मारायचे, मार खायचा, रडायचे, सर्व काही करायचे, परंतु राग-द्वेष करायचे नाहीत. इकडच्या-तिकडच्या सर्व गप्पागोष्टी करायच्या पण सुपरफ्ल्युअस (वरवर) नंतर काही नाही, असे राहायचे. हे नाटक आहे, याची रिहर्सल (पूर्वाभ्यास) तर पूर्वीच झाली आहे. ह्यात तुम्ही नवीन असे काहीच करत नाही.

## जगत कर्ता - वास्तवात कोण?

ही शास्त्रा पलीकडची गोष्ट आहे. आम्हाला दोन प्रकारच्या गोष्टी

सांगाव्या लागतात. तुमच्यासारखा खूपच विचारशील मनुष्य असेल, त्याने जर विचारले की, 'हे जग कुणी बनविले?' तर आम्ही सांगू की, 'गॉड इज नॉट द क्रिएटर ऑफ धीस वर्ल्ड अॅट ऑल!' (देव या जगाचा निर्माता नाहीच.) परंतु सर्व सामान्य लोकांनी आम्हाला विचारले, किंवा मोठ्या सभेत कोणी विचारले तर आम्ही असे सांगू की, 'गॉड इज द क्रिएटर' (देव या जगाचा निर्माता आहे.) कारण काय? तर ते फॅक्ट (तथ्य) त्यांना समजणार नाही. म्हणून त्यांना जे समजेल तसेच बोललेले बरे, त्यांना समजणार नाही असे जर काही आम्ही बोललो तर त्यांचे अवलंबन (आधार) मोडून जाईल. आणि अवलंबनाशिवाय मनुष्य जगू शकत नाही.

गॉड इज द क्रिएटर ऑफ धीस वर्ल्ड (देव या जगाचा निर्माता आहे.) ही गोष्ट भ्रांतीच्या भाषेत बरोबर आहे, त्या व्ह्यू पॉइंटने (दृष्टीकोनाने) बरोबर आहे.

एखादा व्ह्यू पॉइंटवाला असेल तर त्याचे प्रारब्ध आम्ही पाहून घेतो की त्याच्या प्रारब्धात आमची ही फॅक्ट (यथार्थ) गोष्ट नाही. म्हणून मग आम्ही त्याला त्याच्या व्ह्यू पॉइंटनुसारच मदत करतो. त्यामुळे तो पुढे प्रगती करतो.

देवाने हे जग बनविले ही गोष्ट रियल नाही. ती रिलेटिव्ह गोष्ट आहे. रिलेटिव्हकडे तर अनंत वेळा गेलो, परंतु आपले काम कधी संतोषकारक झाले नाही. त्यासाठी तर रियलकडेच जावे लागेल.

तुम्ही जे काही जाणता त्याहून पुढचेही जाणावे तर लागेलच ना? सध्या जगात जे ज्ञान चालत आहे त्यालाच तुम्ही खरे ज्ञान मानले आहे, हेच खरे ज्ञान असे मानता. परंतु ते तर लौकिक ज्ञान आहे. त्याच्याहून तर खूप पुढे जावे लागेल.

**प्रश्नकर्ता :** एवढे मोठे जग एवढा मोठा कारभार देवाशिवाय दुसरा कोण करू शकेल?

**दादाश्री :** देवाकडे दुसरे कामधाम नव्हते, म्हणून बनवले वाटते!!!

**प्रश्नकर्ता :** ज्याने पण बनविले, पण त्याने खूप समजून बनविले आहे असे वाटते.

**दादाश्री :** का? त्याच्या मुलाचे लग्न लावायला मुलगी मिळत नव्हती, म्हणून त्याने हे ब्रह्मांड बनविले असे वाटते?

**प्रश्नकर्ता :** तर मग याचा क्रिएटर (निर्माता) कोण आहे?

**दादाश्री :** क्रिएटरचा अर्थ कुंभार असा होतो. कुंभार म्हणजे प्रजापती, जो मातीची भांडी बनवतो. देव कुंभार नाही, देव तर देवच आहे. फॉरेनवाले सगळे लोक असेच मानतात की, गॉड इज द क्रिएटर ऑफ धीस वर्ल्ड (देवच या जगाचा निर्माता आहे.) मुस्लिम लोक बोलतात की अल्लाहने हे जग बनविले. फॉरनचे सायंटिस्ट (शास्त्रज्ञ) आम्हाला भेटतात तेव्हा आम्ही त्यांना सांगतो की 'गॉड इज द क्रिएटर ऑफ धीस वर्ल्ड इज करेक्ट बाय ख्रिश्चनस् व्ह्यू पॉइंट, बाय हिंदूज् व्ह्यू पॉइंट, बाय मुस्लिमस् व्ह्यू पॉइंट, बट नॉट बाय फॅक्ट.' बाय फॅक्ट, 'ओन्ली सायंटिफक सरकमस्टेन्शियल एविडन्स.' जर तुम्हाला फॅक्ट जाणण्याची इच्छा असेल तर माझ्याकडे या, अन्यथा तुम्हाला साध्य समाधान आहेच ना? तुम्हाला काय वाटते?

**प्रश्नकर्ता :** सर्व धर्मांचे ध्येय तर एकच आहे तरीसुद्धा ओपिनियन्स (विचारधारा) वेगवेगळ्या का आहेत? आणि सगळे 'आमचेच खरे आहे' असे का म्हणता?

**दादाश्री :** या वर्तुळात हा सेंटर (केंद्रबिंदू) आहे. आणि या 360 डिग्री आहेत. एखादा धर्म 60 डिग्रीवर आहे, एखादा धर्म 120 डिग्रीवर आहे, एखादा 180 डिग्रीवर आहे. अशा प्रकारे प्रत्येकाचा व्ह्यू पॉइंट वेगवेगळा असतो. आता 140 डिग्रीचा व्ह्यू पॉइंटवाला जे पाहतो, त्याच्याहून 200 डिग्रीवाला वेगळे पाहतो. 140 डिग्रीवाला, 200 डिग्रीवाल्याला सांगतो की, तू खोटा आहेस, म्हणजे तो 200 डिग्रीवाल्याला खोटा ठरवतो. आम्ही काय सांगतो की 200 डिग्रीवाल्याने 140 डिग्रीवर यावे आणि 140 डिग्रीवाल्याने 200 डिग्रीवर जावे. मग त्या स्थानावर

जाऊन तिथून बोला. तेव्हा दोघेही बोलतील की 'हो, ही खरी गोष्ट आहे.' तुमच्या लक्षात आले ना? परंतु 360 डिग्रीवाला व्ह्यू पॉइंटच संपूर्ण आहे, अर्थात ज्याचा जो व्ह्यू पॉइंट असेल तो त्या व्ह्यू पॉइंटनेच बोलतो, की मी जे सांगतो तीच खरी गोष्ट आहे. व्ह्यू पॉइंटचे सत्य कधी कम्प्लीट (संपूर्ण) सत्य नसते.

एक ख्रिश्चन व्ह्यू पॉइंट आहे, एक मुस्लिम व्ह्यू पॉइंट आहे, एक जैन व्ह्यू पॉइंट आहे, परंतु हे सर्व व्ह्यू पॉइंटस्च आहेत. सर्वजण एकच गोष्ट सांगू इच्छितात. सेंटरला जाणणे हीच सर्वांची इच्छा आहे. पण ते सेंटरची गोष्ट आपल्या स्वतःच्या व्ह्यू पॉइंटने पाहतात आणि सांगतात. सर्व धर्म वेगवेगळ्या डिग्रीवर आहेत, म्हणून सर्वांमध्ये भांडणे आहेत. परंतु खुदाकडे भांडण नाही. खुदाकडे तर काय आहे, एकच गोष्ट जाणण्यासाठी, सगळ्यांचे वेगवेगळे व्ह्यू पॉइंटस् आहेत. लोक म्हणतात हे जग देवाने बनविले, गॉड इज द क्रिएटर ऑफ धीस वर्ल्ड! ही गोष्ट तुमच्या व्ह्यू पॉइंटने खरी आहे, परंतु फॅक्टने (वास्तविकतेत) 100 टक्के चुकीची आहे. फॅक्ट नेहमीच सैद्धांतिक असते. आणि व्ह्यू पॉइंट वेगवेगळे असतात. फॅक्टमध्ये फक्त सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्सेस् आहेत.

कोणाच्याही व्ह्यू पॉइंटला तोडू नये. जोपर्यंत फॅक्ट समजत नाही, तोपर्यंत त्यांना व्ह्यू पॉइंटमध्येच राहू द्यावे आणि त्यासाठी त्यांना मदत पण करावी. आम्ही तसेच करतो. आम्ही त्यांच्या व्ह्यू पॉइंटलाच मदत करतो. त्यामुळे ते पुढची प्रगती करू शकतात. आणि ज्यांना फॅक्ट (वास्तविकता) समजून घ्यायची आहे, त्यांना फॅक्ट समजावतो. हे रियल आहे, अगदी सायंटिफिक आहे आणि ते संपूर्ण जगासाठी आहे. तुम्हाला त्यातील जे हवे ते इथून घेऊन जा. आम्ही सेंटरमध्ये आहोत. आमचे कोणाशीही मतभेद नाहीत.

**प्रश्नकर्ता :** उपनिषदामध्ये हेच सांगितले आहे की ईश्वर कर्ता नाही.

**दादाश्री :** ईश्वर जर कर्ता असता तर त्यालाही कर्मबंधन झाले असते.

**प्रश्नकर्ता :** माझ्या मनात पण हा प्रश्न नेहमी यायचा की ईश्वर कर्ता कसा काय असू शकतो? पण आता तुम्हाला भेटल्यावर मला हे सर्व स्पष्ट झाले आहे.

**दादाश्री :** भगवंत वीतराग आहेत. मोठे मोठे महात्मा आमच्याशी बोलायला येत. 'ईश्वर कर्ता आहे' ही त्यांची मान्यता सुटत नाही. मग आम्ही त्यांना विचारतो की जर देवाने हे सर्व बनविले आहे, तर मग त्या देवाला कुणी बनविले? तेव्हा ते निरुत्तर होतात. गोष्ट लॉजिकल (तार्किक) आहे. जर कोणी बनवणारा आहे, तर मग त्यालाही बनवणारा कोणीतरी असला पाहिजे, आणि त्या बनवणाऱ्यालाही कुणीतरी बनविणारा असला पाहिजे. ही तार्किक गोष्ट आहे.

ईश्वराने बनविलेले नाही, तर मग त्याच्यावर का आरोप करता? ईश्वर तर ईश्वर आहे. वीतराग आहे. द वर्ल्ड इज धी पझल इटसेल्फ. गॉड हॅस नॉट पझल्ड धीस वर्ल्ड अॅट ऑल. ईश्वराने जर का हे पझल (कोडे) उभे केले असते ना तर, या सी.बी.आय वाल्यांना वरती पाठवून त्या ईश्वराला पकडून तुरुंगात टाकावे लागले असते. ईश्वराने असे जग बनवलेच का, की जिथे सर्वच दुःखी आहेत? ईश्वराने हे पझल उभे केलेले नाही.

गॉड इज नॉट द क्रिएटर ऑफ धीस वर्ल्ड अॅट ऑल, ओन्ली सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्स (ईश्वर या जगाचा कर्ता नाहीच, फक्त सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्सच आहे.) ईश्वराला हे सर्व बनविण्याची काही गरजच नाही. हे जग कोणी बनवलेलेच नाही. कारण जर ह्या जगाची सुरुवात असती, तर त्याचा अंत पण असता. परंतु या जगाची सुरुवात कधी झालीच नाही, ते अनादिपासून आहे आणि अनंतापर्यंत असेल. त्याचे कधी सर्जनही झाले नाही आणि कधी नाशही होणार नाही, असे अनादि-अनंत आहे.

**प्रश्नकर्ता :** परंतु हे जग विनाशी आहे.

**दादाश्री :** नाही, ते अनादि-अनंत आहे, पर्मनन्ट (अविनाशी) आहे. जे सनातन असते त्याचा आदिही नसतो आणि अंतही नसतो.

**प्रश्नकर्ता :** माणसांसाठी तर हे जग विनाशीच आहे ना?

**दादाश्री :** ते बरोबर आहे. ती रिलेटिव्ह गोष्ट आहे. ऑल धीस रिलेटिव्हस् आर टेम्परररी ॲडजस्टमेंट्स, परंतु हे जग तर अनादि-अनंत आहे.

तुम्हाला कोणतीही वस्तू पर्मनन्ट आहे असे वाटते का?

**प्रश्नकर्ता :** तसे बघितले तर सर्व काही टेम्परररी (विनाशी)च आहे.

**दादाश्री :** हो, टेम्परररी आहे, तर मग पर्मनन्ट असे काही आहे का?

**प्रश्नकर्ता :** पर्मनन्ट तर फक्त निसर्गच असू शकतो.

**दादाश्री :** निसर्ग? निसर्ग तर निरंतर बदलतच राहतो. त्याच्या एका अवस्थेचा नाश होतो आणि दुसरी अवस्था उत्पन्न होते. तो पर्मनन्ट कसा असू शकतो? तर मग पर्मनन्ट काय असू शकते?

**प्रश्नकर्ता :** ती प्रक्रियाच पर्मनन्ट आहे ना?

**दादाश्री :** त्यात तर एक अवस्था नष्ट होते आणि दुसरी अवस्था उत्पन्न होते. यात पर्मनन्ट अशी कोणती वस्तू आहे?

**प्रश्नकर्ता :** जी नाश करणारी आहे आणि जी उत्पन्न करणारी वस्तू आहे, तीच पर्मनन्ट ना?

**दादाश्री :** नष्ट करणारा कोण आहे?

**प्रश्नकर्ता :** सर्व निसर्ग आहे.

**दादाश्री :** तुम्ही निसर्गाची व्याख्या बरोबर सांगत नाही.

**प्रश्नकर्ता :** तेच तर ज्ञान आहे. निसर्गाच्या व्याख्येचे जर ज्ञान असेल तर माणसाला निसर्ग म्हणजे नक्की काय हे समजेल, की हा निसर्ग काय आहे!

**दादाश्री :** जेवल्यानंतर तुम्ही झोपून जाता, मग आतील सर्व कोण चालवते? आत बाइल (पित्त), पाचकरस हे सर्व तुम्ही टाकता का? आणि चोवीस तासात अन्नाचे रक्त बनते, ते कोण बनवते? लघवी कोण बनवते? या सर्वांचे पृथक्करण होऊन जाते, तर ते सर्व कोण करतो? ईश्वर करतो का हे सर्व? मग कोण करतो? कोणालाही करावे लागत नाही. जग हे असेच चालत राहते, निसर्गच चालवत असतो.

**प्रश्नकर्ता :** निसर्ग म्हणजे कोण?

**दादाश्री :** निसर्ग म्हणजेच सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्स. तुम्ही इथे कसे आलात? तर कितीतरी सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्स (वैज्ञानिक संयोगिक प्रमाण) जुळून येतात तेव्हा कार्य होते.

2H (हाईड्रोजन) आणि एक O (ऑक्सिजन) सायंटिस्टला दिले तर तो सांगेल आम्ही यापासून पाणी बनवून देऊ. मग जर आपण त्याला विचारायले की 'तुम्ही पाण्याचे मेकर (बनविणारे) आहात का?' त्यावर तो म्हणेल 'हो, मला 2H आणि एक O द्या तर मी तुम्हाला पाणी बनवून देईन.' म्हणजे तोपर्यंत त्याला मेकर म्हणू शकतो. परंतु नंतर आमच्याजवळचे 2H संपले, फक्त एकच H उरले आहे, आणि 2O आहे तर आता त्यापासून पाणी बनवून दे, असे जर आपण त्याला सांगितले, तर तो काय म्हणेल 'नाही, यांच्यापासून पाणी बनू शकत नाही.' मग तू कसला मेकर? 2H आणि एक O एकत्र केल्यावर पाणी बनतेच ना. वरून जे पावसाचे पाणी पडते, त्यात देव काहीच करत नाही. तर आपोआपच असे संयोग एकत्र येतात आणि पावसाचे पाणी खाली पडते. यात मेकरची (बनवणाऱ्याची) काहीच आवश्यकता नाही. तो सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्स आहे.

एक मनुष्य आता जिवंत आहे. त्याला जर एखाद्या असा औषधाचा डोस पाजला तर तो मरण पावतो, तर त्याला कोणी मारले? देवाने मारले? की कोण्या माणसाने मारले?

**प्रश्नकर्ता :** त्यासाठी पोस्टमॉर्टम (मरणोत्तर तपासणी) केले पाहिजे.

**दादाश्री :** होय, पोस्टमॉर्टम केल्यावर खरी हकीकत समजेल की नक्की काय झाले होते. कोणत्या वस्तूने किंवा कोणत्या औषधाने तो मरण पावला हे समजेल. असे असे सरकमस्टेन्शियल एविडन्स एकत्र झाले आहेत की ज्यामुळे त्याचा मृत्यू झाला. त्याला जरासे विष दिले की ते विषच त्याला मारते. देव पण मारत नाही आणि विष देणाराही मारत नाही. विष देणाऱ्याने विष दिले आणि त्याला उलटी झाली तर ते विष बाहेर निघून जाईल मग तो मरणार नाही. विष देणाराच जर त्याला मारणारा असता तर तो माणूस नक्कीच मेला असता. म्हणजे विषच मारत असते. देव यात हात घालतच नाही.

हे निव्वळ विज्ञान आहे. तुमचे शरीर कसे बनले आहे, तेही विज्ञानच आहे. हे जग असेच या विज्ञानाने चालत आहे. हे शरीर पण असेच या विज्ञानामुळेच उत्पन्न होत असते. यात ब्रह्मदेवाची आवश्यकता नसते, विष्णुचीही आवश्यकता नसते, आणि शिवचीही आवश्यकता नसते. देव हे शरीर बनवत नाही, पण देवाची उपस्थिती मात्र असायला हवी. देव उपस्थित आहे म्हणून शरीर बनते अन्यथा बनणार नाही.

**प्रश्नकर्ता :** सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्स हे जरा सविस्तर समजवा.

**दादाश्री :** हो. तुम्ही मला भेटायला कसे आलात? यावर तुम्हाला जेवढे दिसते (समजते) तेवढे तुम्ही सांगता, की मला ह्या भाऊंनी सांगितले की, 'आज ज्ञानी पुरुष इथे येणार आहेत.' त्यांनी असे सांगितल्यावर तुम्ही विचार केला की 'चला, आज जाऊया.' मग तुम्ही इथे आलात, मी पण बाहेर जाणार होतो पण गेलो नाही. म्हणून तुम्हाला

दर्शन घडले. म्हणजे या मागे कितीतरी कॉजेस (कारणे) आहेत. जेवढे दिसतात तेवढेच कॉजेस नाहीत, तर इतरही खूप सारे कॉजेस आहेत. यातील एक जरी कॉज मिळाला नाही तर काम होत नाही. कोणत्या कॉजेसमुळे घडले, हे तुम्हाला माहीत नाही. या कॉजेसला सायंटिफिक एवढ्यासाठीच म्हटले आहे की यात पुष्कळ गुह्य कॉजेस आहेत. तुम्हाला थोडेफार समजले ना?

**प्रश्नकर्ता :** होय.

**दादाश्री :** लोक बोलतात की देवाने माझ्या मुलाला मारून टाकले. आमचे फार मोठे नुकसान केले. ह्या सर्व चुकीच्या गोष्टी आहेत. असे बोलू नये. देव तर देव आहे!!! देवाने कधीही कोणताही गुन्हा केलेला नाही.

समजा तुम्ही तुमच्या बायकोसोबत टेबलावर आरामात जेवण जेवत आहात, मग पाच मिनिटानंतर कोणत्यातरी गोष्टीवरून तुमचे मतभेद झाले, तर ते मतभेद कोणी करविले? तुम्हाला जर विचारले की, तुमची इच्छा होती का? तुम्ही तुमच्या मर्जीने मतभेद केलेत? तर तुम्ही म्हणाल 'नाही.' तुमच्या बायकोला विचारले तर ती पण 'नाही' असेच म्हणेल. तर मग हे मतभेद कोणी करविले?

**प्रश्नकर्ता :** रिलेटिव्ह कॅरेक्टर (व्यवहारिक चारित्र्य), मन, स्वभाव या सर्वांवर आधारित आहे.

**दादाश्री :** ते सर्व तर विजिबल कॉजेस (प्रत्यक्ष दिसणारी कारणे) आहेत. पण रियल कॉजेस (खरी कारणे) हवीत. विजिबल कॉजेस म्हणजे जी डोळ्यांनी पाहता येतात, आणि कानांनी ऐकता येतात.

**प्रश्नकर्ता :** सायंटिस्टप्रमाणे तर आम्हाला विजिबल कॉजेसच बघावी लागतात ना?

**दादाश्री :** तुमच्याकडे दुसरा पर्यायच नाही. पण मग हे मतभेद कोण करवीत असेल?

**प्रश्नकर्ता :** कित्येक लोक या शक्तीला देव म्हणतात, कित्येक निसर्ग म्हणतात, कित्येक अदृश्य शक्ती म्हणतात, पण तिचे नाव मात्र कोणीच सांगत नाही.

**दादाश्री :** ती एकच शक्ती आहे. तिच्या आधारावरच हे सर्व चालते. दुसरा कोणी मॅनेजर (प्रबंधक) नाही. आणि ही शक्तीसुद्धा एखाद्या कंप्युटरसारखी आहे. त्यात चेतन नाही. त्यात जर चेतन असते तर देवावरच आरोप लागला असता की तोच हे सर्व चालवितो. त्या शक्तीमुळे सर्व काही चालते. तुम्हाला वास्तविकता जाणून घेण्याची इच्छा आहे का ?

**प्रश्नकर्ता :** होय. वास्तविकताच जाणायची आहे.

**दादाश्री :** बाय फॅक्ट द गॉड इज नॉट क्रिएटर ऑफ धीस वर्ल्ड ॲट ऑल. ओन्ली सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्स.

**प्रश्नकर्ता :** हु जनरेटेड धीस एविडन्सेस् (हे संयोग कोण निर्माण करतो ?)

**दादाश्री :** हो, ती एक शक्ती आहे, जी सर्व संयोग निर्माण (एविडन्सेस् जनरेट) करते.

**प्रश्नकर्ता :** ती कोणती शक्ती आहे ती ?

**दादाश्री :** आम्ही तिला 'व्यवस्थित शक्ती' असे नाव दिले आहे. ती 'व्यवस्थित शक्ती' या दुनियेला व्यवस्थितच ठेवते. सूर्य, चंद्र, तारे सगळ्यांना व्यवस्थित ठेवते. अनादि काळापासून सर्व व्यवस्थितच ठेवत आहे. सर्व जीवांचे येणे-जाणे, तुमचा संसारदेखील ती शक्तीच चालवीत आहे, निरंतर! जीवमात्रांचे सर्व काही 'व्यवस्थित शक्तीच' चालवीत आहे. दररोज तिच शक्ती काम करत आहे. सर्व संयोग एकत्र करणे हेच तिचे काम आहे, दुसरे काही काम नाही. जसा तो मोठा कंप्युटर असतो ना, त्यासारखेच हिचे काम आहे.

**प्रश्नकर्ता :** ही कंप्युटरची गोष्ट समजली नाही.

**दादाश्री :** समजा, तुम्हाला विचार आला की मंदिर उभारण्याची आवश्यकता आहे. इथे तुम्ही हा विचार केला, आणि तो विचार मोठ्या कंप्युटरमध्ये, म्हणजेच जी 'व्यवस्थित शक्ती' आहे, त्यात नोंदवला गेला. तुम्ही विचार केला, ते कॉज (कारण) आहे, ते कॉज मग 'व्यवस्थित शक्ती'मध्ये जाते. नंतर 'व्यवस्थित शक्ती' त्या सर्वांचा (परिणाम) स्वरूपात सर्व संयोग एकत्र करून देते. आणि मग तुम्हाला त्याचे फळ मिळते. मग तुम्ही मंदिर उभारता. तुम्ही तर अहंकाराने बोलता की, 'हे मी केले', परंतु ते सर्व 'व्यवस्थित शक्ती'च चालवीत असते.

अशा प्रकारे जो परिणाम येतो, ते 'व्यवस्थित शक्ती'चेच काम आहे, हे आम्ही ज्ञानात पाहून बोलत आहोत. 'व्यवस्थित शक्ती' एक्जेक्ट (यथार्थ) गोष्ट आहे. हा आमच्या लाखो जन्मांचा शोध आहे.

**प्रश्नकर्ता :** 'व्यवस्थित शक्ती'ला भगवंत म्हणू शकतो का?

**दादाश्री :** नाही, 'व्यवस्थित शक्ती'ला भगवंत म्हणून काय फायदा? या टेपरेकॉर्डला भगवंत म्हणून काय फायदा? भगवंताला भगवंत म्हटले पाहिजे, आणि टेपरेकॉर्डला टेपरेकॉर्ड म्हटले पाहिजे. जिथे भगवंत नाही, तिथे भगवंताचे आरोपण करून काय फायदा? पण लोक तर या 'व्यवस्थित शक्ती'लाच भगवंत बोलतात.

'व्यवस्थित शक्ती'ला जर आपण भगवंत म्हटले तर त्या पत्राला 'व्यवस्थित शक्ती' स्वीकारत नाही, कारण त्यावर भगवंताचा पत्ता आहे. आणि व्यवस्थित शक्ती स्वत: भगवंत नाही, त्यामुळे ते पत्र तिथून परत येते आणि मग भगवंताकडे जाते. त्याचप्रमाणे आपला अर्ज (प्रार्थना, विनंती) भगवंताकडेच जात असतो. त्यामुळे फायदा होतो. अशी प्रार्थना केल्यामुळे परोक्ष फायदा मिळतो. परंतु पुरेपूर फायदा तर भगवंताला ओळखल्यानेच होतो. यथार्थपणे भगवंताला ओळखायला हवे.

परोक्ष भगवंताची भजना केल्यानेही फायदा मिळतो. काही ना काही करायला तर हवे. त्यामुळे प्रकाश मिळतो, सद्बुद्धी राहते नाहीतर ती पण राहणार नाही.

**प्रश्नकर्ता :** 'व्यवस्थित शक्ती'ची आमच्यावर कृपा व्हावी यासाठी काय करायला हवे?

**दादाश्री :** जगात कृपा करणारा दुसरा कोणीच नाही. तुमच्या आत जो परमात्मा आहे त्याचीच कृपा होते. कृपा करणारा दुसरा कोणी नाही.

'व्यवस्थित शक्ती'चे एक्जेक्ट स्वरूप मी थोडक्यात सांगतो.

समजा एखादे नाटक असेल, तर त्याची रिहर्सल आधीच होत असते, नंतर ते नाटक सादर केले जाते. मग (नाटक पाहताना) कोणताही विचार करण्याची आवश्यकता नसते, कारण त्याची रिहर्सल आधीच झालेली आहे. आणि त्याचप्रमाणेच नाटक होणार. ते 'व्यवस्थित'च आहे. ज्याची रिहर्सल तुम्ही पाहिलेली आहे, ते नाटक आता सादर झाले तर ते 'व्यवस्थित'च आहे. त्यात बदल होणार नाही. जशी रिहर्सल केली होती, तसेच आता नाटक होणार. मागील जन्मात जशी रिहर्सल झाली असेल त्याचप्रमाणे मग या जन्मात त्याचे 'व्यवस्थित' होत असते. म्हणजे ते रिहर्सल मग 'व्यवस्थित'मध्ये जाते. मागील जन्मात जी रिहर्सल केली जाते, ती 'अवस्थित' रूपात असते आणि ते अवस्थित जेव्हा फळ देण्यास तयार होते, तेव्हा ते 'व्यवस्थित' होते, मग त्यात जन्मापासून ते मृत्यूपर्यंत काहीही परिवर्तन होणार नाही.

**प्रश्नकर्ता :** जे निसर्गाचे नियम आहेत. तेच 'व्यवस्थित'चे नियम आहेत की तेच 'व्यवस्थित' आहे? दोन्ही एकच आहेत की वेगवेगळे?

**दादाश्री :** निसर्गाचा कायदा बिलकुल नियमात आहे. आणि जे सर्व जीवमात्र आहेत, ते सगळे 'व्यवस्थित'मध्ये आहेत. त्यांचे काय होईल, काय नाही, या सर्वांचा हिशोब आधीच तयार झालेला असतो. निसर्गाचे नियम त्यात मदत करतात. 'व्यवस्थित' म्हणजे जन्मापासून ते मृत्यूपर्यंतची ही फिल्म, तयार झालेली आहे. ही काच आता फुटली, पण खरोखर तर ही काच या आधीच फुटली होती, पण ती आता (फुटलेली) दिसते. असे हे जग, असे आहे की इथे एक परमाणू

देखील कधी वाढत नाही किंवा कमी होत नाही. अविनाशीमध्ये सर्व वस्तू तशाच राहतात. आणि जे काही होत असते ते विनाशीमध्ये होत असते. सर्व अवस्था विनाशी आहेत आणि विनाशीमध्ये तो मेला असे दिसते. परंतु अविनाशीमध्ये कोणी मरतच नाही. हा मेला, असे झाले, तसे झाले, ह्या सर्व रॉंग बिलीफस् आहेत, राईट बिलीफमध्ये असे काही होतच नाही.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही सांगता की 'सर्व गोष्टी निर्माण झालेल्या आहेत, निश्चित आहेत', तर ते काय आहे?

जे निर्माण झालेले आहे, ते सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्स आहे, म्हणजे व्यवस्थित आहे. आणि जे अजून निर्माण झालेले नाही ते सायंटिफिक सरकमस्टेन्शिय एविडन्स नाही. जे डिस्चार्ज आहे, ते निर्माण झालेले आहे, ते सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्स आहे. तुम्ही आता इथे सत्संगात आलात ते डिस्चार्ज आहे. व्यापार करता तो डिस्चार्ज (कर्मफळ) आहे, झोपता तेही डिस्चार्ज आहे, दिवसभराचे सर्व काही डिस्चार्ज आहे. आता आमच्याशी बोलत आहात तेही डिस्चार्जच आहे. आणि सर्व डिस्चार्ज आधीच निर्माण झालेले आहे आणि (नवीन) जे चार्ज होत आहे, ते (अजून) निर्माण झालेले नाही. चार्ज आपल्या हातात आहे.

हे जग फक्त निर्माण नाही, तर चार्ज पण आहे आणि डिस्चार्ज पण आहे. तो डिस्चार्जच सर्व निर्माण झाला आहे. जी बॅटरी डिस्चार्ज होत आहे ती आधी निर्माण (चार्ज) झाली आहे. जशी चार्ज झाली होती तशीच आता डिस्चार्ज होत आहे.

अहंकार हाच संसार आहे. अहंकार आणि ममता निघून गेल्यावर मोक्ष होतो. जन्मापासून मृत्यूपर्यंत ज्या ज्या अवस्था येतात, अभ्यासाची, खेळण्याची, आजारपणाची, नोकरीची, लग्नाची, ब्रह्मचर्य आश्रमाची, संन्यास आश्रमाची, त्या सर्व डिस्चार्जच आहेत. आणि जर आतमध्ये नवीन काही चार्ज झाले नाही तर मग पुढचा जन्म बंद होतो. परंतु जे डिस्चार्ज आहे ते तर डिस्चार्जच राहते. चार्ज करणारे अहंकार व ममता

जर निघून गेले तर डिस्चार्ज सहजरित्या होऊन जाते आणि मग मोक्ष प्राप्त होतो.

आचरण डिस्चार्ज आहे. जे आचरण आहे-आचार आहे तो डिस्चार्ज आहे आणि जेव्हा चार्ज होणे बंद होते तेव्हा मग सर्व डिस्चार्ज संपून जातो. तेव्हा आता सर्व प्रथम काय करायला हवे?

**प्रश्नकर्ता :** चार्ज करणे बंद व्हायला हवे.

**दादाश्री :** तर मग तुम्हाला कर्मबंधन होत आहे की नाही?

**प्रश्नकर्ता :** ते तर होते.

**दादाश्री :** पाहा ना, जेव्हा तुम्ही असे बोलता की 'हे मी केले.' तेव्हा चार्ज होते. मी पण बोलतो की 'हे मी केले' पण मी नाटकीय बोलतो आणि तुम्ही खरोखर बोलता.

**प्रश्नकर्ता :** परंतु 'मी केले, मी कर्ता आहे' असे मला कधीच वाटत नाही.

**दादाश्री :** मग तुम्ही कोण आहात?

**प्रश्नकर्ता :** मी त्याच्याच शोधात आहे.

**दादाश्री :** तर मग तुम्ही स्वतःच कर्ता आहात. अजून तुम्हाला 'मी केले' याची जबाबदारी वाटते. पण जेव्हा तुम्हाला सेल्फ रियलाइजेशन (आत्मसाक्षात्कार) होईल त्यानंतर मग तुमची जबाबदारी राहणार नाही. तुम्ही माना किंवा मानू नका परंतु जोपर्यंत आत्मसाक्षात्कार झालेला नाही तोपर्यंत मात्र ती जबाबदारी तुमचीच आहे.

फक्त आत्माच जाणायचा आहे. आत्म्याचे ज्ञान नसेल तोपर्यंत सर्व अवघड (अटपटासाठी शब्द निवडावा) वाटेल आणि आत्म्याचे ज्ञान झाले की मग काहीच अवघड वाटणार नाही. हे सर्व ओझे अवघडपणाचे आहे. एकदा सेल्फ रियलाइजेशन (आत्मासाक्षात्कार) झाले की ही सर्व पझल्स सॉल्व होतात (कोडी सुटतात). व्हेन धीस

पझल एन्डस्, देन नो पझल ॲन्ड देअर इज द सोल. (हे कोडे जेव्हा सोडवले जाते तेव्हा दुसरे कोणतेच कोडे शिल्लक राहत नाही, आणि तिथेच आत्मा आहे.)

**प्रश्नकर्ता :** तुम्ही या पझलचा अंत कसा होतो हे तर सांगितले, पण ह्या पझलची सुरुवात कुठून झाली ?

**दादाश्री :** 'देअर इज नो बिगिनिंग ॲन्ड नो एन्ड ऑफ धीस पझल. व्हेअर देअर इज अ बिगिनिंग, देअर इज ॲन एन्ड. (या कोड्याची सुरवातही नाही आणि अंतही नाही. ज्याची सुरवात असते, त्याचा अंतही असतो.)

**प्रश्नकर्ता :** मग हे कोण करवितो ?

**दादाश्री :** ती शक्ती आहे. ती एका मोठ्या कंप्युटरसारखी आहे. शास्त्रीय भाषेत तिला समष्टी म्हणतात. एखाद्या माणसाकडे त्याचे स्वत:चे कंप्युटर असते, ते व्यष्टि रूप आहे आणि सर्व जीवांचा एक कम्बाइन (एकत्र) कंप्युटर आहे, ते समष्टी रूप आहे. आणि त्यानेच हा सर्व व्यवहार चालत असतो. याला आम्ही सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्स, (व्यवस्थित शक्ती) असे म्हणतो. जी दररोज सूर्य, चंद्र, तारे, सर्वांना व्यवस्थितच ठेवते.

**प्रश्नकर्ता :** जी शक्ती हे सर्व जे चालविते, ती येते कुठून ?

**दादाश्री :** ती नैसर्गिक शक्ती आहे, भगवंताची शक्ती नाही. ही खूप मोठी गोष्ट आहे, पटकन समजेल अशी गोष्ट नाही. हा जो ॲटम बॉम्ब (अणू बॉम्ब) बनवला आहे, तो अणूपासून बनवला आहे, तर अणूमध्ये किती शक्ती असेल ?

**प्रश्नकर्ता :** प्रचंड शक्ती आहे.

**दादाश्री :** अशीच ती शक्ती आहे. प्रचंड शक्ती असणाऱ्याने या परमात्म्याला दु:ख दिले आहे. पण परमात्म्याची शक्ती याहूनही जास्त आहे. म्हणून मग परमात्मा स्वत:च्या शक्तीने सुटतो.

**प्रश्नकर्ता :** परमात्म्याच्या शक्तीहूनही अधिक ही कोणाची शक्ती आहे?

**दादाश्री :** कोणाची? त्याहून जास्त कोणतीही शक्ती नाही. परमात्म्याची शक्ती खूपच जास्त, सर्वात जास्त आहे. आणि जो अनात्मा (पुद्‌गल) आहे, त्याचीही शक्ती खूप आहे.

**प्रश्नकर्ता :** ही शक्ती परमात्म्यापेक्षाही वरचढ आहे?

**दादाश्री :** नाही, परमात्म्याचा कोणीही उपरी (वरचढ, मालक) नाही. परंतु ती अनात्म्याची शक्ती खूपच राक्षसी शक्ती आहे, त्या शक्तीने तर परमात्मा स्वत: बांधला गेला आहे. आता परमात्म्याला मुक्त व्हायचे आहे, परंतु तो मुक्त होऊ शकत नाही. मग यावर उपाय काय सांगितला आहे की जो मुक्त झाला आहे, त्याच्या मदतीने मुक्त होता येईल.

**प्रश्नकर्ता :** परंतु जो मुक्त झाला आहे, त्याला कोणी मुक्त केले?

**दादाश्री :** वेळेने त्याला मुक्त केले आहे. त्याची वेळ झाली होती म्हणून मुक्त झाला. सर्व जीवांची जेव्हा वेळ येईल तेव्हा ते मुक्त होतील. हा संसार तुरुंग आहे. परमात्मा संसाररूपी तुरुंगात आहे, आणि वेळ संपल्यावर मुक्त होईल.परंतु वेळ संपण्यापूर्वी, त्याला मुक्तपुरुष (जे सांसारिक, विनाशी बंधनांपासून मुक्त झाले आहेत) यांचे दर्शन होईल आणि तेव्हा मुक्ती मिळेल. मुक्त पुरुष यात निमित्त आहेत. हे निमित्त भेटल्यामुळे ते मुक्त होतात.

## मग जगाचा कर्ता कोणी आहे की नाही?

या जगाचा कर्ता कोणीच नाही, आणि कर्त्याशिवाय हे जग बनले नाही!

हे जग कोणी बनविले?

**प्रश्नकर्ता :** आम्हाला माहीत नाही, तेच जाणण्याचा प्रयत्न करत आहोत.

**दादाश्री :** हो, सगळे लोक हे जाणून घेण्याचा प्रयत्न करतात पण कोणालाही माहीत नाही. द वर्ल्ड इज द पझल इटसेल्फ. देवाने हे पझल केलेले नाही. देव तर परमानंदी आणि परम ज्योतिस्वरूप आहे.

**प्रश्नकर्ता :** मग काय स्वत:नेच पझल केले आहे?

**दादाश्री :** नाही, स्वत: पझल कसे करणार? या जगाचा कोणी क्रिएटर (निर्माता) नाही. या जगाचा कोणी कर्ता नाही. देव पण कर्ता नाही आणि तुम्ही पण कर्ता नाही आणि विनाकर्ता हे जग बनलेलेही नाही. आम्ही परस्पर विरोधी गोष्टी बोलत आहोत ना? परंतु ही समजण्यासारखी गोष्ट आहे. 'कर्ता नाही' म्हणजे कोणी स्वतंत्र कर्ता नाही. आणि 'कर्ता आहे' म्हणजे नैमित्तिक कर्ता आहे.

स्वत: कर्ता असता तर मोक्षाला गेला नसता, सुटलाच नसता. नैमित्तिक कर्ता आहे, म्हणून सुटू शकतो. स्वतंत्र कर्ता असता तर तो या जगाचा मालक बनला असता की 'मी हे जग बनविले आहे, म्हणून मी मालक आहे.' असे म्हणाला असता परंतु कोणाला शौचाला जाण्याचीही स्वत:ची स्वतंत्र शक्ती नाही, मग तो कसला मालक?! कोणीच मालक नाही. नैमित्तिक कर्ता कशाला म्हणतात की या डॉक्टरांचा धक्का तुम्हाला लागला आणि तुमचा धक्का या भाऊंना लागला आणि ते भाऊ पडले. त्यांचा पाय मोडला, म्हणून ते तुम्हाला म्हणतील, 'तुम्ही माझा पाय मोडला.' पण तुम्ही जाणता की, तुम्हाला या डॉक्टरांचा धक्का लागला होता. म्हणजे यात तुमची काही इच्छा नाही, जबाबदारी नाही. त्याचप्रमाणे या नैमित्तिक कर्त्याचे आहे. कर्ता तर आहे पण नैमित्तिक कर्ता आहे. द वर्ल्ड इज धी पझल इटसेल्फ, गॉड हॅस नॉट पझल्ड धीस वर्ल्ड ॲट ऑल, ओन्ली सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्सेस् आहेत.

तुम्ही समुद्र किनारा पाहिला आहे का? त्या समुद्र किनाऱ्यापासून थोड्याच अंतरावर तुमचा बंगला असेल, त्या बंगल्याच्या कंपाउंडमध्ये तुम्ही दोन लोखंडी सळ्या ठेवल्या. आणि मग वर्षभरानंतर तुम्ही त्या

बंगल्यावर गेलात तर त्या लोखंडाला काही होते का? मग त्या लोखंडाला गंज कोणी लावला? समुद्राने हे केले? खाऱ्या वाऱ्याने केले? लोखंडाची इच्छा होती? खारी हवा म्हणेल यात माझी इच्छा नव्हती, मी तर असे काही केले नाही. समुद्राला विचारले तर तो तर त्याच्या क्षेत्रात रममाण आहे. मग यात लोखंडाची चूक आहे का? लोखंडाला इतर कुठल्या ठिकाणी ठेवले असते तर काहीच झाले नसते. तर मग हे काय आहे? फक्त सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्स आहे. यात परमात्मा काहीच करत नाही. परमात्मा फक्त प्रकाश देतो. तो चोरालाही प्रकाश देतो आणि पोलिसालाही प्रकाश देतो. परमात्मा काय म्हणतो की, 'तुम्ही जे काही करता ते तुमच्या स्वतःच्या जबाबदारीवर करता, मी तर फक्त प्रकाश देतो.

**प्रश्नकर्ता :** हे जे सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्स आहे, ते कसे झाले? त्याला कोणी बनवले?

**दादाश्री :** कोणीही बनविणारा नाही. ते आपोआपच बनते. ते कंप्युटरप्रमाणे चालत असते. पूर्वजन्माचे कर्म आहे, ते फीड झाले होते आणि आता जे फळ आले ते कंप्युटरसारखी जी शक्ती आहे ती फळ देते, तिला 'व्यवस्थित शक्ती' म्हणतात. शास्त्रकारांनी तिला 'समष्टी' म्हटले आहे. आणि इंग्रजीमध्ये त्याला सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्स म्हणतात.

**- जय सच्चिदानंद**

# संपर्क सूत्र

## दादा भगवान परिवार

**अडालज** : **त्रिमंदिर**, सीमंधर सिटी, अहमदाबाद-कलोल हाईवे,
पोस्ट : अडालज, जि.-गांधीनगर, गुजरात - 382421
**फोन** : 9328661166, 9328661177
E-mail : info@dadabhagwan.org

**मुंबई** : **त्रिमंदिर,** ऋषिवन, काजुपाडा, बोरिवली (E)
फोन : 9323528901

| | | | |
|---|---|---|---|
| **दिल्ली** | 9810098564 | **बेंगलूर** | 9590979099 |
| **कोलकता** | 9830080820 | **हैदराबाद** | 9885058771 |
| **चेन्नई** | 7200740000 | **पूणे** | 7218473468 |
| **जयपुर** | 8890357990 | **जलंधर** | 9814063043 |
| **भोपाल** | 6354602399 | **चंडीगढ** | 9780732237 |
| **इन्दौर** | 6354602400 | **कानपुर** | 9452525981 |
| **रायपुर** | 9329644433 | **सांगली** | 9423870798 |
| **पटना** | 7352723132 | **भुवनेश्वर** | 8763073111 |
| **अमरावती** | 9422915064 | **वाराणसी** | 9795228541 |

**U.S.A.** : **DBVI Tel. :** +1 877-505-DADA (3232),
**Email :** info@us.dadabhagwan.org

**U.K.** : +44 330-111-DADA (3232)

**Kenya** : +254 722 722 063

**UAE** : +971 557316937

**Dubai** : +971 501364530

**Australia** : +61 421127947

**New Zealand** : +64 21 0376434

**Singapore** : +65 81129229

**www.dadabhagwan.org**



## जगत कर्ता कोण?

या जगाचा कोणी क्रिएटर (निर्माता) नाही. या जगाचा कोणी कर्ता नाही. देव पण कर्ता नाही आणि तुम्हीही कर्ता नाही. आणि कर्त्याशिवाय हे जग बनलेही नाही. आम्ही परस्पर विरुद्ध बोलत आहोत ना? पण ही समजण्यासारखी गोष्ट आहे. 'कोणी कर्ता नाही' म्हणजे कोणी स्वतंत्र कर्ता नाही, आणि कर्ता आहे, म्हणजे नैमित्तिक कर्ता आहे.

**- दादाश्री**



dadabhagwan.org




**Price ₹ 20**